सत्कार्योत्तेजक सभा—धुळें.

श्री

## रामदास आणि रामदासी

भाग पहिला

# श्रीमत् दासबोध

डोमगांव येथील मठांत असलेल्या खुद्द

श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या

मूळ प्रतीवरून

आवृत्ति दुसरी

भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।

समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥

धुळें—आत्माराम छापखान्यांत छापिला.



विजया दशमी १८२९

सत्कार्योत्तेजक सभा—धुळें.

श्री

## रामदास आणि रामदासी
भाग पहिला

# श्रीमत् दासबोध

डोमगांव येथलि मठांत असलेल्या खुद्द
श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या
मूळ प्रतीवरून

आवृत्ति दुसरी

भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।
समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥

धुळें—आत्माराम छापखान्यांत छापिला.



विजया दशमी १८२९

# प्रस्तावना



श्रीमत्

## दासबोधांतर्गत श्रीसमर्थचरित्र



**मी शुद्ध मतिमंद। घेतों चरित्राचा छंद।**
**पूर्ण करी गोविंद। कृपाळुपणें॥**

—आत्मारामबोवा.

श्रीसमर्थांचें त्यांच्या हयातींत लिहिलेलें असें एखादें हि चरित्र अजून उपलब्ध नसावें याचें मला फार दिवस वाईट वाटत असे. त्यांचीं प्रकाशित अशीं जीं चरित्रें आहेत, तीं सर्व त्यांच्या पश्चात् शंभर वर्षांनंतर लिहिलीं गेलीं आहेत. परंतु त्यांच्या हयातींत दुसऱ्या कोणीं तरी त्यांचें चरित्र लिहिलेलेंच काय, पण खुद्द श्रीसमर्थांनीं स्वतः लिहिलेलें आत्मचरित्र उपलब्ध झाल्याचें ऐकून वाचकांस कितीतरी आनंद वाटणार आहे. असें हें श्रीसमर्थांचें आत्मचरित्र ह्मणजे श्रीमत् दासबोध हा ग्रन्थ होय. दासबोधांत समर्थांनीं आपलें स्वतःचें चरित्र वर्णिलें आहे. अपण कशा रीतीनें वागलों हें सर्व त्यांनीं दासबोधांत लिहून ठेविलें आहे. कोणत्या विवक्षित प्रसंगीं आपण कसें वागलों हें त्यांनीं जरी सांगितलें नाहीं तरी स्वतःच्या चरित्राचें सामान्य धोरण कसें होतें याचें विस्तृत वर्णन त्यांनीं करून ठेविलेलें आहे. इतकें विश्वसनीय व आदरणीय असें समर्थांचें दुसरें चरित्र कोणतें असणार? अशा ह्या दासबोधांतर्गत पावन चरित्राचें विवेचन या ठिकाणीं करण्याचें योजिलें आहे.

श्रीसमर्थांचें चरित्र सर्वांना अवगत आहे असें मी समजतों. प्रकाशित अशीं त्यांचीं पांच चरित्रें आहेत: —(१) हनुमंतस्वामींनीं मांगितलेली बखर (२) मुख्यतः तिच्याच आधारानें चौबळांनीं लिहिलेलें चरित्र (३) आत्मारामबोवाकृत ओवीबद्ध चरित्र (४) उद्धवसुतकृत ओवीबद्ध चरित्र आणि (५) महिपतिकृत ओवीबद्ध "संतविजय" नामात्मक चरित्र. हीं सर्व चरित्रें सर्वांनीं वाचावीं अशी मी नम्रपणें शिफारस करितों. तीं वाचण्यांत जो काळ जाईल तेवढा सर्व कारणीं लागेल अशी मी ग्वाही देतों, तिजवर वाचकांनीं विश्वास ठेवावा. असो, प्रत्येकानें यांपैकीं कोणतें ना कोणतें तरी चरित्र वाचलेलें आहे असें मानून तें सारें चरित्र श्रीमत् दासबोधांत कसें आलें आहे हें दाखविण्याचा या ठिकाणीं यथामति प्रयत्न करितों.

समर्थांचें सर्व चरित्र अशा प्रस्तावनेंत सांगणें जरी शक्य नाहीं, तरी पुढील विवेचन वाचकांना पटावें ह्मणून त्या चरित्राची रूपरेषा या ठिकाणीं दहा पंधरा वाक्यांत देऊन ठेवणें इष्ट वाटतें:—

श्रीरामदास स्वामी शके १५३० त जांबगांवीं जन्मास आले; १५४२ त लग्नसमारंभांतून ते पळाले; तेथून टांकळीस जाऊन बारा वर्षे त्यांनीं पुरश्चरण केलें; पुढें बारा वर्षे तीर्थयात्रेसाठीं सर्व आर्यावर्तभर त्यांनीं पर्यटन केलें; १५६६ त ते कृष्णाकाठीं चाफळखोऱ्यांत आले; आपल्या वर्तनानें लोकांचीं मनें त्यांनीं आपल्याकडे वेधून घेतलीं; ठिकठिकाणीं मारुतीची स्थापना केली, मठ स्थापन केले, शिष्यसांप्रदाय वाढविला, उत्साह सुरू केले; श्रीशिवाजीमहाराजांवर अनुग्रह केला; त्यांच्या आग्रहावरून श्रीसज्जनगडीं रहावयास गेले; व तेथें शके १६०३ त अवतारसमाप्ति केली.

असें हें समर्थांचें थोडक्यांत चरित्र आहे, पण त्यांतील प्रत्येक कृति विचार करण्यासारखी आहे.

आपल्या वयाच्या बाराव्या वर्षीं लग्नसमारंभांतून समर्थ पळाले याचा अर्थ काय ? बाराव्या वर्षी पळाले! ज्या वयांत हल्लीं मुलाला मागील चौकांत रात्रीच्या वेळीं आंचवावयास जाण्यास बरोबर आई सोबत यावी लागते,

---

१ श्रीरामदास आणि रामदासी मालेंतील दुसऱ्या भागांत आणखी दोन चरित्रें, या ग्रन्थाच्या पहिल्या आवृत्तीनंतर छापलीं गेलीं आहेत.

त्या वर्षांत समर्थ त्या काळीं जांबगांवाहून निघून गंगेच्या कांठाकांठानें पंचवटीस आले, तेथें श्रीरामाचें दर्शन घेऊन टांकळीस गेले व तेथें पुरश्चरण करण्यासाठीं बारा वर्षें राहिले! त्यांना काय कमी होतें म्हणून ते पळाले? कोणता पाश त्यांना नव्हता म्हणून त्यांना सहज पळतां आलें? त्यांना आई होती, वडील बंधु होते, भावजय होती, घर होतें, शेती होती, इनाम होतें, वृत्ति होती व तटकन् तोडण्याला अशक्य असा पाश अगदीं त्यांच्या गळ्यांत पडण्याच्या बेतांत आला होता, त्यांचें लग्न हि होत नव्हतें असें नाहीं; तरी पण इतक्या अल्पवयांत ते पळाले. समर्थ म्हणतातः—

**देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी ।**
**सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तोहि वेचावा ॥ ४-८-८.**

या वचनानुरूप श्रीरामचंद्राचें सख्यत्व जोडण्यासाठीं घरदार, शेतीवाडी, जमीनजुमला, आई, बंधु इत्यादिकांचा त्याग करून श्रीसमर्थ लग्नसमारंभांतून फडकले.

संसार करावा किंवा न करावा असा या ठिकाणीं सहज एक प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर देण्यापूर्वी एक गोष्ट लक्ष्यांत घेतली पाहिजे ती ही कीं, संसार आणि प्रपंच यांत समर्थांनीं पुष्कळ वेळा भेद मानला आहे.‡ हा भेद विचारांत न घेतां, श्रीसमर्थांनीं प्रपंचाची जी तरफदारी केली आहे तिचा उपयोग संसारी लोक स्वतःच्या वर्तनाचें समर्थन करण्याकडे करीत असतात.

प्रपंच— मग तो व्यक्तिप्रपंच असो किंवा राष्ट्रप्रपंच असो— प्रपंच म्हणजे चरितार्थाचा धंदा, जीवनाचें साधन. हा प्रपंच सोडून कोणा हि व्यक्तीचें किंवा राष्ट्राचें चालावयाचें नाहीं.

**प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ॥**

असें समर्थांचें निक्षून सांगणें आहे. परंतु संसाराची गोष्ट तशी नाहीं. संसार म्हणजे बायकापोरांचा संसार. संसार म्हणजे आपलें घर, आपली शेती, आपला पैसा, आपली जिवलग माणसें. हा असला संसार करा वा नका करूं. न कराल तर उत्तमच, कारण त्याच्या नादीं लागल्यानें राष्ट्रप्रपंचाचा संकोच करावा

‡ हा भेद लक्ष्यांत न आल्यामुळें वरील प्रश्नाचा उलगडा करतांना पहिल्या आवृत्तीचे वेळीं कोडें पडलें होतें.

लागतो; परंतु वाटल्यास संसार करा हि; पण प्रपंचांत मात्र असा विकल्प नाहीं, प्रपंच हा केलाच पाहिजे. परमार्थाला संसाराची उलटी अडचण होते, परंतु प्रपंचावांचून परमार्थ होत नाहीं. पोटालाच ज्याच्या नाहीं, तो परमार्थ काय करणार? उपाशी मरणाराला परमार्थाची कधीं जोड झाली आहे?

**प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ॥**

आणि मग अशा करंट्या माणसाच्या किंवा राष्ट्राच्या हातून परमार्थ कसा व्हावा? यासाठीं पोटापाण्याचा प्रश्न आधीं मग परमार्थचर्चा.

**आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ॥**

हें प्रपंचाचें झालें. प्रपंच करण्याविषयीं समर्थांचा जसा कटाक्ष आहे तसा संसाराविषयीं नाहीं; किंबहुना संसार न करण्याविषयीं त्यांचा आग्रह आहे असें म्हटलें तरी चालेल. संसाराविषयीं ते म्हणतात

**संसारसंगें सुख जालें । ऐसें देखिलें ना ऐकिलें ॥ ५-३-१०१.**

तथापि मनुष्य विचार करील तर संसार करून हि जन्माचें सार्थक करूं शकेल. उदासवृत्ति धारण करून केलेला संसार परमार्थाच्या आड येत नाहीं असें इतर साधुसंतांप्रमाणें समर्थांनीं हि सांगितलें आहे. (१२×८)

**संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधी न सांडितां ।**
**जनामधें सार्थकता । विचारें चि होये ॥**

हें सर्व जरी खरें असलं, तरी पण संसार हा मिथ्या आहे असें एकदाचें ज्ञान झाल्यावर तो करण्यांत तरी काय गोडी आहे, असें मनांत येऊन श्रीसमर्थ म्हणतात

**संसार मिथ्या ऐसा कळला । ज्ञान समजोन निघोन गेला ।**
**तेणें जन पावन केला । आपणाऐसा ॥**

आणि

**ह्मणौन संसार सांडावा । मग साधूचा शोध घ्यावा ।**
**फिरफिरों ठांई पाडावा । साधु जन ॥ २०-३-२६.**

असेंच समर्थांचें हृद्गत दिसतें. हा मार्ग विशेष श्रेयस्कर होय व श्रीसमर्थांनीं स्वतः त्याच मार्गाचा अवलंब केला होता.

**ईश्वरें मोठें सूत्र केलें । मनुष्यमात्र गुंतोनि राहिलें ॥**

अशा त्या सूत्राच्या योगानें श्रीसमर्थ बद्ध होण्याचा अगदीं समय आला होता, तोंच ब्राह्मणवचनावरून सावध होऊन सर्वसंगपरित्याग करून ते पळाले, ही गोष्ट सर्वविश्रुतच आहे. अर्थात् समर्थांचें स्वतःचें चरित्र पाहिलें ह्मणजे संसारत्यागच त्यांना इष्ट आहे असें ठरतें; परंतु अशा निश्चयाचीं धैर्याचीं व ज्ञानाचीं माणसें थोडीं असतात म्हणून

संसार सुखें करावा। परी कांहीं परमार्थ वाढवावा।
परमार्थ अवघाच बुडवावा। हें विहित नव्हे ॥

अशा प्रकारें संसार करण्याची परवानगी श्रीसमर्थ मोठ्या कष्टानें देत आहेत. दुसऱ्यांना परवानगी देतात पण स्वतः मात्र ते

जयास वाटे सुखचि असावें। तेणें रघुनाथभजनीं लागावें।
स्वजन सकळही त्यागावे। दुःखमूळ जे ॥ ३-१०-६३

ह्या वचनास अनुसरून आपल्या वयाच्या १२ व्या वर्षी स्वजनांचा त्याग करून नाशकाजवळ टांकळीस त्रयोदशाक्षरी राममन्त्राचें पुरश्चरण करण्यास गेले, तेथें संगमावर ते पुरश्चरणास जात, नंतर पंचवटीस माधुकरी मागून देवास नैवेद्य करीत, इत्यादि कथा वाचकांस माहितच आहेत. अशा प्रकारें टांकळीस बारा वर्षें त्यांनीं जीं रघुनाथभजनांत घालविलीं त्यापासून काय झालें हें त्यांच्याच शब्दांनीं येथें देणें बरें.

आमुचे कुळीं रघुनाथ। रघुनाथें आमुचा परमार्थ।
जो समर्थाचाहि समर्थ। देवां सोडविता ॥ ६-७-२१.
त्याचे आह्मी सेवक जन। सेवेकरितां जालें ज्ञान।
तेथें अभाव धरितां पतन। पाविजेल कीं ॥ ६-७-२२.
करी दुर्जनाचा संव्हार। भक्तजनासी आधार।
ऐसा हा तों चमत्कार। रोकडा चाले ॥ ६-७-२९.
मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासोन जातें।
कृपा केलियां रघुनाथें। प्रचित येते ॥ ६-७-३०.
रघुनाथभजनें ज्ञान जालें। रघुनाथभजनें महत्व वाढलें।
ह्मणौनियां तुवां केलें। पाहिजे आधीं ॥ ६-७-३१.

इतक्यावर हि ज्या कोणाचें समाधान होणार नाहीं त्यासाठीं समर्थ ह्मणतात,

हें तों आहे सप्रचित। आणी तुज वाटेना प्रचित।
साक्षात्कारें नेमस्त। प्रत्ययो करावा ॥ ३२

२९ व्या ओवींत जो रोकडा चमत्कार दिला आहे तो श्रीशिवाजीमहाराजां-च्या अभ्युदयाला अनुलक्षून असावा काय? रघुनाथभजनाचा महिमा काय आहे तो श्रीसद्गुरु समर्थ स्वानुभवानें ३० आणि ३१ ओव्यांत सांगत आहेत. रघुनाथकृपेंत इतकें सामर्थ्य आहे कीं जें मनांत आणावें तें होतें! आपण आपल्या देशासंबंधानें कितीतरी गोष्टी मनांत आणीत असतों? त्या सफळ होण्यास या ठिकाणीं स्पष्ट मार्ग दाखविला आहे. रघुनाथभजनापासून आपणास इतकें ज्ञान झालें, आपलें जें आज इतकें महत्व आहे तें रघुनाथभजना-मुळें आहे, यासाठीं सर्वांनीं रघुनाथाचें भजन करावें असें ते ह्मणतात.

अशा रीतीनें रघुनाथकृपा संपादन करण्यांत बारा वर्षे घालवून श्रीसमर्थ तीर्थयात्रा करण्यास निघाले. आपल्या आर्यावर्तातील तीर्थक्षेत्रांची रचना मोठी मौजेची आहे. नुसतीं चार धामें किंवा बारा ज्योतिर्लिंगें करण्याचें कोणीं मनांत आणल्यास त्याला सर्व देशभर फिरल्याचें श्रेय मिळतें. मग समर्थांनीं तर यच्चावत् सर्व तीर्थक्षेत्रें करण्यांत बारा वर्षे क्रमिलीं.

नाना पुरश्चरणें करावीं। नाना तीर्थाटणें फिरावीं।
नाना सामर्थ्यें वाढवावीं। वैराग्यबळें ॥ १०-७-१३

या एका ओवींत समर्थांच्या सर्व चरित्राचा समावेश होऊं पाहतो. पहिलीं बारा वर्षे बाळपणांत गेलीं, पुढलीं बारा वर्षे पुरश्चरणांत व त्याच्या पुढचीं बारा वर्षे तीर्थाटणांत गेल्यावर श्रीसमर्थ आपल्या वयाच्या ३६ व्या वर्षी कृष्णाकांठीं चाफळखोऱ्यांत आले. बारा आणि बारा चोवीस वर्षे भगवत्प्राप्तीसाठीं खर्ची घातल्यानंतर श्रीसमर्थांनीं कृष्णाकांठीं येऊन जगदुद्धाराच्या कार्यास आरंभ केला. त्या वेळीं जेवढे लोक हयात होते तेवढे सारे भाग्यवान्! ज्यांना श्रीसमर्थचरणाचें पावन दर्शन घडलें त्यांच्या भाग्याला तुळणा नाहीं; ज्या दिवशीं समर्थांचे चरण कृष्णाकांठाला लागले तो महाराष्ट्राच्या भाग्योदयाचा पहिला दिवस. येथून पुढें समर्थांनीं वैराग्येंकरून नाना सामर्थ्यें वाढविलीं, तीं कशीं याचें चिंतन करणें आल्हादकारक आहे.

चाफळखोऱ्यांत श्रीसमर्थ आल्यानंतर त्यांनीं काय काय केलें याचें चरित्रांतून जें वर्णन आलें आहे त्यावरून असें दिसतें कीं, आरंभीं कित्येक वर्षे

त्यांनीं दऱ्याखोऱ्यांतून हिंडण्यांत काढलीं. गांवांत हि ते क्वचित् येत, पण आले तरी त्यांचें वर्तन पिसाटासारखें असे. आरंभीं आरंभी तर श्रीसमर्थांना लोक बावळट समजत असत. पण ह्या बावळ्या मूर्तीचें खरें स्वरूप लोकांना पटकन् कसें उमजावें?

**जनास दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित ।**
**अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १४-७-१५.**

त्यामुळें आरंभीं लोकांना श्रीसमर्थांची परीक्षा झाली नाहीं, परंतु कालांतरानें समर्थांच्या यथार्थ स्वरूपाचा बोध लोकांना होऊं लागला. बावळ्याचा जरी त्यांनीं वेष पतकरला होता, तरी लोकांचें अंतःकरण आपल्या वाणीनें आणि आचरणानें त्यांनीं आपणाकडे वेधून घ्यावें.

**वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा ।**
**सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूं नये ॥ १५-१-२१.**

अशा प्रकारचें त्यांचें वर्तन असे. इष्ट कार्यांत यश येऊं लागेपर्यंत तें फार बोलत नसावेत. पण जें थोडें ते बोलत तें लोकांना पटत असे, त्यामुळें साहजिकच लोकांचें लक्ष हळु हळु त्यांच्याकडे लागूं लागलें. त्यांना कोणापासून हि स्वतःकरितां कांहीं मिळवावयाचें नव्हतें. त्यांची वर्तणूक निस्पृहपणाची असे. आपला बहुतेक काळ ते अरण्यांत कंठीत. कामापुरते गांवांत येत; परंतु तेवढ्या वेळांत लोकांना त्यांच्या प्रत्ययज्ञानाची चटक लागावी असें त्यांचें वर्तन असे.

**प्रत्यये बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला ।**
**नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १५-२-१९.**
**परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना ।**
**वेष पाहातां हीन दीना । सारिखा दिसे ॥ २०**
**उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।**
**तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१**

यांत, उदंड करी गुप्तरूपें । हें चरण ध्यानांत घेण्यासारखें आहे. लोकसंग्रह करणारांना हा इषारा त्यांनीं अन्यत्र हि दिलेला आहेः—

परि हें गुप्तरूपें केलें । पाहिजे सर्वै ॥ १५-१-२८.
उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ ११-१०-१८.
राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच नेदावें ॥ ११-५-१९.

असो.

ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी ।
मत्सरमतांची गोवी । लागोंच नेदी ॥ १५-२-२२.
खनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे ।
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३
अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहाणें नेमक ।
सृष्टीमधें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४

या तीन ओव्यांत चाफळखोऱ्यांतील समर्थांचें सर्व चरित्र आलें आहे. चाफळखोऱ्यांत ठिकठिकाणीं मारूतीची स्थापना करून व रामजयंती, हनुमानजयंती, इत्यादि उत्सव सुरू करून समर्थांनीं लोकांना भजनाला लावावें, पण आपण मात्र तेथें राहूं नये. अमुक अमुक उत्सव कोण करतो तर आपण करतों अशा लौकिकाची चाड त्यांना नव्हती, ह्मणून लोकांना भजनीं लावून ते तेथून अन्यत्र चालते होत. चाफळखोऱ्यांतल्या डोंगरांतली किंवा चंद्रगिरीच्या डोंगरांतली समर्थांची एकांतांत बसावयाची जी रामघळ आहे तिचें दर्शन ज्यांना घडलें असेल त्यांना २३ वी ओवी किती तंतोतंत समर्थांना लागते हें सांगण्याची जरूर नाहीं. अशा त्या खनाळामध्यें ह्मणजे निर्जनस्थळीं समर्थ जाऊन बसत. तेथें ते कोणाच्या दृष्टीस पडत नसत, पण त्यांना मात्र सर्वांची सर्वकाळ चिंता वाटत असे. खुद्द चाफळास उत्सव सुरू असतां हि समर्थ तेथें न राहातां डोंगरांत जाऊन बसत, हें त्यांनीं स्वतः एके ठिकाणीं सांगितलेंच आहे.

दास डोंगरीं राहातो । यात्रा देवाची पाहातो ।
देव भक्तासवें जातो । ध्यानरूपें ॥

ह्या एकंदर विवेचनावरून श्रीसमर्थांना कोणती चिंता लागली होती व त्यांच्या वर्तनाचें धोरण कशा प्रकाराचें होतें, यांची कांहींशी अटकळ बांधतां येते. सुमारें अडीचशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत एक असा सत्पुरुष होऊन गेला, कीं त्यानें आपल्या एकट्याच्या हिताचा सर्वस्वीं त्याग करून

आपल्या आयुष्याचीं चोवीस वर्षें प्रथम भगवत्प्राप्ती करून घेण्यांत खर्च केलीं आणि मग कांहीं वर्षें केवळ स्वदेशस्थितीचें चिंतन करण्यांत व देशोन्नतीचे उपाय शोधून काढण्यांत दऱ्याखोऱ्यांत कंठिलीं. ते फारसे बोलत नसावेत असें जें मीं वर म्हटलें आहे तें ह्या त्यांच्या पूर्व स्थितीला अनुलक्षून होय.

**उदास वाटते जीवीं । आतां जावें कुणीकडे ।**
**तूं भक्तवत्सला रामा । बुद्धि दे रघुनायका ॥**

ही जी त्यांनीं करुणा भाकिली आहे, ती ह्याच पूर्व तयारीच्या वेळीं होय. "उदासीन हा काळ कोठें न कंठे" अशी जी त्यांची स्थिति झाली होती ती याच वेळीं.

चाफळखोऱ्यांत समर्थांचें जें वर्तन असे त्याचें वर्णन दासबोधांत ११ व्या दशकाच्या १० व्या समासांत सहज येऊन गेलें आहे. निस्पृह मनुष्याचें वर्तन कसें असतें हें त्या समासांत दिलें आहे. हें वर्णन म्हणजे समर्थांचे प्रचीतीचे बोल होत.

निस्पृहाची ही शिकवण किती तरी मौल्यवान् आहे. जें चरित्र आपण केलें तेंच या समासांत सांगितलें आहे, असें खुद्द त्यांचेंच वचन असल्यामुळें द. ११×१० त समर्थांचें आत्मचरित्र आहे, असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. असें तें आत्मचरित्र थोड्याशा विस्तारानें या ठिकाणीं उतरून घेण्यास वाचकांची परवानगी असावी.

**कीर्तिरूपें उदंड ख्यात । जाणती लाहानथोर समस्त ॥**
**वेष पाहाता शाश्वत । येकहि नाहीं ॥ ५ ॥**
**प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनास कळेना ॥**
**पाहों जाता आडळेना । काये कैसें ॥ ६ ॥**
**वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण ॥**
**चाळणेविण येक क्षण । जाऊंच नेदी ॥ ७ ॥**
**त्यागी वोळखींचे जन । सर्वकाळ नित्य नूतन ॥**
**लोक शोधून पाहाती मन । परी इछा दिसेना ॥ ८ ॥**
**पुर्ते कोणाकडे पाहेना । पुर्ते कोणासीं बोलेना ॥**
**पुर्ते येके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ९ ॥**

जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना ॥
आपुली स्थिति अनुमाना । येवोंच नेदी ॥ १० ॥
लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें तें उलथवी ॥
लोकीं तर्किलें तें दावी । निर्फळ करूनी ॥ ११
लोकांस पाह्याचा आदर । तेथें याचा अनादर ।
लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिछया ॥ १२ ॥
एवं कल्पितां कल्पेना । ना तर्कितांहि तर्केना ॥
कदापी भावितां भावेना । योगेश्वर ॥ १३ ॥
ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठाईं पडेना ॥
क्षणयेक विश्रंभेना । कथाकीर्तन ॥ १४ ॥
लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघेचि निर्फळ होती ।
जनाची जना लाजवी वृत्ति । तेव्हां योगेश्वर ॥ १५ ॥
बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें ।
तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १६ ॥
अखंड येकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा ।
काळ सार्थकचि करावा । जनासहित ॥ १७ ॥
उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास सिकवावे ।
उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ १८ ॥
आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ ।
साक्षेपेंविण केवळ । वृथापुष्ट ॥ २० ॥
लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ।
जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ २१ ॥
अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें
आपला मगज राखणें । कांहींतरी ॥ २३ ॥
हें प्रचितीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें ।
मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीयेकें ॥ २४ ॥
महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखरावे । नाना देसीं ॥ २५ ॥

हें समर्थांनीं आपण होऊन दिलेलें चरित्र वारंवार वाचावें व त्याचें मनन करावें असें कोणास वाटणार नाहीं? यांपैकीं कोणती ओवी विशेष महत्वाची ह्मणून सांगावी! चाळणेविण येकक्षण। जाऊंच नेदी ॥ यावरून श्रीसमर्थांचा व्याप व्यक्त होत आहे. ८ पासून १५ पर्यंतच्या ओव्यांत लोकांच्या ठिकाणीं आपणाविषयीं आदर उत्पन्न होण्यास कसें वागावें याचें वर्णन आलें आहे. पुष्कळ लोकांनीं आपल्याविषयीं तर्क कुतर्क करून आपलें वर्तन अखेरीस त्यांच्या पसंतीस आलें तर मग मोठेंच कार्य साधलें असें समजावें. हें महत्कृत्य-कोणतें बरें? अर्थात् समर्थांनीं जगदुद्धारासाठीं स्वीकारलेल्या महत्कृत्याव्यतिरिक्त दुसरें कोणतें महत्कृत्य हें असणार? समर्थांनीं स्वीकारलेल्या कार्यांत लोकसंग्रहाचें महत्व विशेष होतें; आणि या ठिकाणीं महत्कृत्य ह्मणून जो उल्लेख आला आहे तो लोकसंग्रहाला अनुलक्षून असावा असें वाटतें. एकांत सेवावा, पण तेथें जो विचार सुचेल त्याचा उपयोग लोकहिताकडे करून जन्माचें सार्थक करावें असा बोध १७ व्या ओवींत आहे. अलिकडे देशभक्तांचा जो एक नवीन वर्ग उत्पन्न होत आहे, त्यांनीं २० वी ओवी लक्षांत घेण्यासारखी आहे. देशहिताची इच्छा प्रबळ असून हि परमेश्वर काय करील तें खरें, अशा प्रकारचे हताश उद्गार काढून स्वस्थ बसण्याचें ज्यांच्या मनांत येतें त्यांनीं

**आधीं कष्ट मग फळ। कष्टाचि नाहीं तें निर्फळ॥**

या दोन चरणांचें मनन करावें. हा समर्थांचा स्वानुभव आहे. परमेश्वर काय करील तें खरें हें ह्मणणें अयथार्थ नाहीं, पण आपण कष्ट केल्यावांचून परमेश्वर आपणांस जें पाहिजे आहे तें देणार नाहीं हें हि तितकेंच खरे आहे. किंबहुना आपले कष्ट व परमेश्वराची कृपा या दोन्ही गोष्टी कार्यसिद्धीला सारख्याच आवश्यक आहेत. याच मताचें स्पष्टीकरण मी पुढें करणार आहे ह्मणून येथें इतकेंच पुरे. आज्ञाधारक असा उदंड समुदाय आपल्यापाशीं झाला ह्मणजे त्या समुदायाशीं कसें वागावें याविषयींचा उपदेश २१ व २३ या दोन ओव्यांत आहे. २४ व्या ओवींत समर्थ आपण होऊन सांगत आहेत कीं, या सर्व गोष्टी आपण नुसत्या सांगत नसून त्या स्वतः केलेल्या आहेत. २५ वी ओवी फारच महत्त्वाची आहे, ह्मणून तिचा विचार थोडासा विस्तारानें करूं.

**महंतें महंत करावे। युक्तिबुद्धीनें भरावे।**
**जाणते करून विखरावे। नाना देसीं॥**

महंत ह्मणजे मठपति. जो मठपति आहे त्यानें दुसरे मठपति करावे व त्यांना शहाणपण शिकवून नाना देशांत संचार करण्यास पाठवावे. समर्थांचें चरित्र वाचकांना अवगत आहेच. समर्थांनीं एकंदर सात आठशें मठ स्थापन केले होते, परंतु त्यांत ७२ मठ मुख्य होते. ह्या ७२ पैकीं बहुतेक मठपति ब्रह्मचारी होते. सर्व मठपति समर्थांनीं शहाणपण शिकवून तयार केले होते. समर्थांची त्यांना जी शिकवण असे तिचा विचार केला ह्मणजे महाराष्ट्राच्या अभ्युदयाचे कार्मी या सर्व महंतांचा किती तरी उपयोग झाला असला पाहिजे याचें अनुमान प्रत्येक वाचकाला करतां येण्यासारखें आहे. समर्थ आपल्या शिष्यांना कोणत्या युक्तिबुद्धीनें भरीत याचा आपण या ठिकाणीं विचार करूं.

समग्र दासबोध हीच समर्थांची शिकवण असे. अर्थात् दासबोधांतील सर्व शिकवण येथें देण्यानें विस्तार फार होणार आहे, ह्मणून त्या सर्व शिकवणीचें सार संकलित रीतीनें देण्याचा माझा विचार आहे.

रामदासी सांप्रदायाचें **पहिलें अंग** ह्मणजे अध्यात्मविद्या किंवा आत्मज्ञान होय. इतर सर्व गोष्टींपेक्षां अध्यात्माचें महत्त्व कोटिगुणें **अधिक आहे** यांत तिळमात्र शंका नाहीं.

**येकांतीं नाजुक कारबार। तेथें असावें अति तत्पर।**
**त्याच्या कोटिगुणें विचार। अध्यात्मग्रन्थीं॥ १७-३-७.**

दासबोधांतील हा अध्यात्माचा भाग कठिण असल्यामुळें तिकडे आपण दुर्लक्ष करितों; परंतु समर्थांच्या शिकवणीचीं जीं इतर अंगें आहेत तीं आपल्या हल्लींच्या स्थितींत आपणांस पटतात आणि आवडतात ह्मणून आपलें मन पूर्णपणें जर त्याच अंगांकडे वेधलें गेलें तर आपण या ग्रन्थाचीं पारायणें करून कोरडे राहिलों असें होणार आहे. श्रीसमर्थ शिकवितातः

**मुख्य हरिकथानिरूपण। दुसरें तें राजकारण।**
**तिसरें तें सावधपण। सर्वविषईं॥ ११-५-४.**

ह्याच अनुक्रम आणखी दोन ठिकाणीं सांगितला आहे.

**हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ।**
**वर्तायाचें लक्षण । तेंही असावें ॥ ११-६-४.**
**हरिकथानिरूपण । बरेंपणें राजकारण ।**
**प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२-२-२९.**

ह्या तीन ओव्यांवरून श्रीसमर्थांनीं जो सांप्रदाय सुरू केला त्याचें लक्षण काय होतें, हें निश्चयानें सांगण्यास कांहीं हरकत असावी, असें मला वाटत नाहीं. देशकालानुसार या सांप्रदायाला हल्लीं जें स्वरूप प्राप्त झाले आहे, त्याला ह्या वरील ओव्यांची कसोटी लावून पाहाण्याचें काम मी मजकडे घेत नाहीं; परंतु या ठिकाणीं सर्व सांप्रदायिकांना माझी अति नम्रपणें अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनीं या ओव्यांचें मनन करावें. तशीच सांप्रदायाच्या बाहेरच्या हि लोंकांना माझी एक प्रार्थना आहे. असे पुष्कळ लोक आहेत कीं जे सांप्रदायांत नसून हि त्यांची श्रीसमर्थांवर व त्यांच्या ग्रन्थांवर पूर्ण निष्ठा आहे. या निष्ठेचें कारण आपण सर्वजण जाणतच आहोंत. त्यांना माझी अशी विनंती आहे कीं या तिन्ही ओव्यांत प्रथम कोणती गोष्ट सांगितली आहे ती कृपा करून पहा व नंतर दुसरी पहा.

रामदासी सांप्रदाय ह्मणून ह्मणतात तो खरोखर हाच होय. श्रीसमर्थांनीं महाराष्ट्राला महाराष्ट्रधर्म शिकविला तो याहून भिन्न नाहीं. हरिकथा आणि निरूपण हें महाराष्ट्रधर्माचें पहिलें अंग होय. हरिकीर्तन आणि निरूपण ह्मणजे काय या गोष्टी उघड आहेत;

**सगुणकथा या नांव कीर्तन । अद्वैत ह्मणिजे निरूपण ॥ ४-२-२३.**

राजकारण हें या सांप्रदायाचें **दुसरें अंग** होय. समर्थ ह्मणतात,

**प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण ॥१९-४-१७.**

यावरून प्रपंच ह्मणजे बायकापोरांचें पोट भरणें व नातवाच्या पणतवाची तरतूद करून ठेवण्याची हांव बाळगणें असा अर्थ होत नाहीं. राजकारण करणें हा प्रपंचांतलाच एक भाग आहे असें या ठिकाणीं मानलेलें दिसतें. राजकारणावांचून केलेला प्रपंच तो प्रपंचच नव्हे. असें असेल तर, अशा प्रपंचाची कोणी तरफदारी केल्यास ती कोण अमान्य करील व असला "प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जेणें केला । तो भला भला रे भला" हें कोणास कबूल होणार नाहीं?

चतुरस्रता हें महाराष्ट्रधर्माचें तिसरें अंग होय. अशीं हीं महाराष्ट्रधर्माचीं तीन अंगें आहेत. अशा धर्माचें संस्थापन करणारानें काय करावें ?

**ऐसा जो माहानुभाव। तेणें करावा समुदाय ॥ १२-१०-३२.**

हरिकथानिरूपण असो किंवा राजकारण असो, ह्मणजे परमार्थ असो किंवा प्रपंच असो, दोन्ही गोष्टी साध्य होण्यास समुदाय पाहिजे. उघडच आहे, कीर्तन, निरूपण किंवा राजकारण ह्या गोष्टी एकट्यानेंच कांहीं करावयाच्या नाहींत, त्यांना समुदायाची अपेक्षा असते. हा समुदाय कसा करावा याचा हि मार्ग श्रीसमर्थांनीं दाखविला आहे.

**आतां समुदायाकारणें। पाहिजेती दोनी लक्षणें ॥**
**श्रोतीं येथें सावधपणें। मन घालावें ॥ १२-१०-३६.**

समुदाय होण्यास दोन गोष्टी पाहिजेत. त्या दोन गोष्टी ह्मणजे

**जेणें बहुतांस घडे भक्ति। ते हे रोकडी प्रबोधशक्ति ॥**
**बहुतांचें मनोगत हातीं। घेतलें पाहिजे ॥ १२-१०-३७.**

ज्याला समुदाय करावयाचा आहे, त्याच्या ठिकाणीं हे दोन गुण पाहिजेत. एक त्याच्या ठिकाणीं प्रबोधशक्ति असावी व दुसरें त्यास लोकांचें मनोगत आपल्या हातीं घेण्याचें धोरण पाहिजे. प्रबोधशक्ति ह्मणजे, मला वाटतें, आपल्या वाणीनें किंवा अन्य उपायांनीं लोकांच्या अंतःकरणामध्यें जागृति उत्पन्न करण्याची शक्ति. ही प्रबोधशक्ति प्राप्त करून घेण्याचे मार्ग पुष्कळ आहेत.

**प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें। जाणे सकळांचीं अंतरें ॥**
**निरूपणें तदनंतरें। चटक लागे ॥ १५-२-१६.**

तथापि ही प्रबोधशक्ति अंगीं येण्यास मुख्य अवश्यक गोष्ट ह्मणजे,

**बोलण्यासारिखें चालणें। स्वयें करून बोलणें ॥ १२-१०-३९.**

ज्याचें बोलणें एक आणि चालणें दुसरेंच, असें असेल त्याच्या ठिकाणीं प्रबोधशक्ति संभवत नाहीं.

**क्रिया करून करवावी। बहुतांकरवीं ॥ ११-५-१६.**

लोकांना केवळ सांगून त्यांच्याकडून क्रिया करवावी असा समर्थांचा उपदेश नाहीं. व्याख्याते व्याख्यानें देतात, तेव्हां जर या उपदेशाची त्यांना आठवण होत जाईल तर केवढा तरी उपयोग होणार आहे.

**आपण करावें करवावें । आपण विवरावें विवरवावें ॥**
**आपण धरावें धरवावें । भजनमार्गासी ॥** १९-१०-१७.

आपलीं व्याख्यानें फोल कां होतात याचें कारण कांहीं निराळें शोधावयास पाहिजे आहे काय? आचार, विचार व उच्चार यांत एकवाक्यता पाहिजे. स्वतः केल्यावांचून दुसऱ्यास करण्यास सांगणें व्यर्थ होय.

**वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥** १२-१०-३.

अशाच्या शब्दाला कोणी मानीत नाहीं. समर्थ ह्मणतात,

**क्रियेविण शब्दज्ञान । तेंचि स्वानाचें वमन ।**
**भले तेथें अवलोकन । कदापी न करिती ॥** १२-१०-३०.

परंतु उलटपक्षीं

**बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें ॥**
**तयाचीं वचनें प्रमाण । मानिती जनीं ॥** १२-१०-२९.

बोलण्यांत आणि चालण्यांत नेहमीं मेळ असला पाहिजे.

**जैसें मुखें ज्ञान बोले । तैसीच सवें क्रिया चाले ॥** १२-४-१३

असें असेल तरच दुसरे लोक त्याच्या भजनीं लागतील, तो सांगेल तें ऐकतील व तो दाखवील त्या मार्गानें जातील. ज्याला समुदाय करावयाचा असेल त्याच्या ठिकाणीं प्रबोधशक्ति पाहिजे व प्रबोधशक्ति अंगीं येण्यास बोलणें आणि चालणें एक पाहिजे.

**जैसें बोलणें बोलावें । तैसेंचि चालणें चालावें ॥**
**मग महंतलीळा स्वभावें । आंगीं बाणे ॥** १२-९-२३.

समुदायाकारणें दुसरी आवश्यक गोष्ट ह्मणजे बहुतांचें मनोगत हातीं घेतलें पाहिजे. लोकांचें अंतरंग जाणून त्यांचीं मनें आपल्याकडे वेधून घेण्याचें सामर्थ्य महंताच्या ठिकाणीं असलें पाहिजे.

**जीवजीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा ॥**
**राहराहों शोध घ्यावा । परांतराचा ॥** १५-१-४.

*ज्याला लोकसंग्रह करावयाचा असेल त्यानें लोकाना दुखवितां कामा नये.* लोकांच्याच मनोगताप्रमाणें वागून हळुहळु आपले हेतु त्यांना कळवून त्यांना आपलेसे करून घेऊन त्यांच्याकरवीं आपलें इष्ट कार्य घडवून आणावें.

**दुसऱ्याचे चालणीं चालावें । दुसऱ्याचे बोलणीं बोलावें ॥**
**दुसऱ्याचे मनोगतें जावें । मिळोनियां ॥** १५-६-१७.

**मुलाचे चालीनें चालावें । मुलाच्या मनोगतें बोलावें ॥**
**तैसें जनास सिकवावें । हळु हळु ॥**१३-१०-२४.

महंताचें वर्तन परांतरानुसारी असावें अशाविषयीं श्रीसमर्थांनीं पुष्कळ ठिकाणीं उपदेश केलेला आहे;

**दुसऱ्याचें अंतर जाणावें । तदनुसारचि वर्तावें ॥**

**परांतरास न लावावा ढका ॥**

—:०:—

**शब्दमत्सर न करावा । कोणि येकाचा ॥**

—:०:—

**अंतरासी लागेल ढका । ऐसी वर्तणूक करूं नका ॥**

तात्पर्य, जे महापुरुष आहेत त्यांनीं

**आवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ॥**

धरून, परांतर जाणून, तदनुसार वर्तन करून आपले हेतु तडीस न्यावेत. लोकांना दुखवून आपलें काम भागणार नाहीं, हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. लोकांना राजी राखूनच जें करणें असेल तें करावें.

**लोक राजी राखोन कीजे । सकळ काहीं ॥** १९-७-७.

ह्मणून ज्याला लोक राजी राखतां येतील तोच खरा महंत. लोकांना राजी राखले ह्मणजे साहाजिकच ते आपले होतील आणि महंताला जें पाहिजे आहे तें हेंच.

**याकारणें मनोगत । राखेल तो मोठा महंत ॥**
**मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ॥** १३-१०-२९.

एवढाच हा रामदासी सांप्रदाय. यापुढें समर्थांची जी शिकवण सांगावयाची ती वरील कार्य घडवून आणण्याला पोषक आहे ह्मणून सांगावयाची.

**मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ॥**
**तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥**

हा सांप्रदाय. याप्रमाणें गोष्टी घडवून आणण्यास समुदाय पाहिजे. समुदाय होण्यास प्रबोधशक्ति व लोकांचें मनोगत हातीं घेण्याचें शहाणपण हे दोन गुण पाहिजेत; व हे दोन गुण आंगीं येण्याचे उपाय किंवा मार्ग आतां सांगावयाचे. हे उपाय अकरा आहेत: १ परिभ्रमण २ चाळणा, विवेक ३ कष्ट ४ मरणाविषयीं बेफिकीरपणा ५ कीर्तीची चाड ६ वैराग्य ७ निस्पृहता ८ मृदु वचन ९ क्षमा, शांति, सहिष्णुता १० परोपकार ११ उत्कटता. असे हे अकरा गुण किंवा त्यांपैकीं शक्य तितके महंताच्या ठिकाणीं पाहिजेत. याविषयीं श्री समर्थ काय शिकवितात त्याचा आपण क्रमशः थोडासा विचार करूं.

श्रीसमर्थ स्वतः एका ठिकाणीं बसून राहत नसत व शिष्यांना बसूं देत नसत.

**येके स्थळीं राहों नये ॥** १४—१.

असें त्यांचें शिकविणें असे. उघड आहे, ज्याला समुदाय करावयाचा आहे, ज्याला राष्ट्राच्या आणि धर्माच्या भजनीं लोक लावावयाचे आहेत, त्याला एका जागीं बसून कसें चालेल ? त्यानें सर्व राष्ट्रभर परिभ्रमण केलें पाहिजे. तें परिभ्रमण करितांना खावें काय अशी पंचाईत न पडावी ह्मणून, भिक्षा मागणें हें एक त्यांनीं आपल्या सांप्रदायाचें विशिष्ट लक्षण बांधून दिलें. भिक्षा मागणें एवढेंच जर या सांप्रदायाचें लक्षण असतें तर प्रत्येक सामान्य भिक्षेकरी आपणास रामदासी ह्मणविता. समर्थांनीं १४–२ त भिक्षेची महती वर्णिली आहे.

**ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागितली पाहिजे भिक्षा ।**
**ओम् भवति या पक्षा । रक्षिलें पाहिजे ॥**

असा त्या समासाचा आरंभ आहे. परंतु सांप्रदायाचें हें लक्षण देखील वाटतें तितकें सोपें नाहीं. भिक्षा मागण्यासाठीं सांप्रदायी बनावयाचें नाहीं, तर सांप्रदायी आहोंत ह्मणून भिक्षा मागावयाची. ही जी भिक्षा मागावयाची ती कां ? पोट भरण्यासाठीं ? नव्हे; समर्थ ह्मणतात:—

**ठाईं ठाईं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा ।**
**प्राणीमात्र बोलवावा । आप्तपणें ॥** १९-२-१७.

कोणत्याही गांवांत जाण्यापूर्वी बाहेरूनच तेथें कोण कसे आहेत, कोण कसे आहेत, ह्याचा शोध घेऊन ठेवावा. देशभक्त कोण देशद्रोही कोण, वाचाळ कोण कार्यकर्ते कोण, दांभिक कोण निष्ठावंत कोण, फुटक्या कवडीच्या स्वार्थासाठीं स्वबांधवांचे गळे कापणारे कोण व इन्द्रपद प्राप्त होत असलें तरी देशाशीं मात्रागमनीपणा न करणारे कोण, इत्यादि तपास करावा व मग शहरांत प्रवेश करावा. तेथें गेल्यावर आपणांस माहित झालेला भेद लोकांच्या प्रत्ययास न आणतां आपण सर्वांचाच गौरव करून त्यांना सन्मार्गावर आणण्याचा प्रयत्न करावा.

**दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे ।**
**सज्जनापरीस आळवावे । महत्व देउनी ॥ १९-९-२३.**

दुर्जनाला दुर्जन ह्मटल्यानें आपणांस काय फायदा व्हावयाचा आहे ? त्याला आपण फक्त ओळखून ठेवावें.

**जनामधें दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटखट ।**
**याकारणें ते वाट । बुझून टाकावी ॥ १९-९-२४.**

अशा तऱ्हेनें सर्व महाराष्ट्रभर–किंबहुना--आर्यावर्तभर संचार करून बऱ्या वाईट लोकांचा शोध करून ठेवावा. खेडेगांव असो किंवा शहर असो, त्याचें परीक्षण केल्यावांचून सोडूं नये. इतकेंच नव्हे, तर या भिक्षेच्या मिषानें प्रत्येक घर आणि घर परीक्षून सोडावें.

**कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें ।**
**भिक्षामिसें लाहान थोरें । परीक्षून सोडावीं ॥ १५-६-२४.**

ही काय पोटासाठीं भिक्षा झाली ? किती अनंत उपकार या दीन झालेल्या राष्ट्रावर त्या सत्पुरुषाचे आहेत कीं, भीक मागण्याला देखील त्यांनीं कांहीं विनाकारण शिकविलें नाहीं. ही जर पोटासाठीं भिक्षा असती तर मिळेल तितकें झोळींतच ओतावें असें त्यांनीं सांगितलें असतें; पण ते ह्मणतात:—

**कांहीं भिक्षा आहे ह्मणावें । अल्पसंतोषी असावें ।**
**बहुत आणितां घ्यावें । मुष्टी येक ॥ १४-२-२०.**

ज्याला पोटासाठींच भिक्षा मागावयाची आहे, त्याला हिंडावयासच कशास पाहिजे ? कोणत्याही एखाद्या मोठ्या शहरीं राहून प्रत्यहीं निरनिराळ्या पांच घरीं भिक्षा मागितली तरी पोट भरेल. त्याला लोकांची परीक्षा करून काय

करावयाचें आहे ? मूठभर धान्य देशभक्ताच्या हातून मिळालें काय आणि देशद्रोह्याच्या हातून मिळालें काय सारखेंच. दात्याच्या अंतःकरणामुळें धान्याला थोडाच गोडपणा किंवा कडवटपणा यावयाचा आहे ? पण ही पोटासाठीं भिक्षा नाहींच आहे.

**नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें ।**
**तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ॥** १४-२-८.

वसुंधरा बहुरत्ना आहे, तेव्हां परिभ्रमण करीत असतां नाना प्रकारच्या लोकांशीं संबंध येऊन देशस्थिति, समाजस्थिति, लोकस्थिति इत्यादिकांचें ज्ञान होणार आहे.

**सृष्टिमधें बहु लोक । परिभ्रमणें कळे कौतुक ।**
**नाना प्रकारींचे विवेक । आडळों लागती ।** १९-८-१.

ह्मणून सर्वत्र परिभ्रमण केलें पाहिजे. आळस करून चालावयाचें नाहीं. एकाच ठिकाणीं बसून राहून लोकसंग्रह व्हावयाचा नाहीं.

**येके ठायीं बैसोन राहिला । तरी मग व्यापचि बुडाला ।**
**सावधपणें ज्याला त्याला । भेटी द्यावी ॥** १५-१-३४.

सर्वांना भेटून त्यांत जे मुख्य मुख्य असतील त्यांच्याशीं सख्य करावें, त्यांना आपल्या विश्वासांत घ्यावें, आपल्या कर्तव्याची दिशा त्यांना समजावून सांगावी आणि त्यांना आपण एकदां आपल्या कार्याकडे ओढून घेतलें, ह्मणजे त्यांचे जे अनुयायी असतात ते सहज येऊन आपणास मिळतात; त्यांच्यासाठीं निराळे श्रम करावे लागत नाहींत.

**याकारणें मुख्य मुख्य । तयासी करावें सख्य ।**
**येणेंकरितां असंख्य । बाजारी मिळती ॥** १५-१-२६.

भिकेला लागलेल्या या राष्ट्राला असले भिक्षेकरी पुनरपि कधीं लाभतील काय ?

ज्याला समुदाय करावयाचा आहे त्याच्या ठिकाणीं **दुसरा गुण** ह्मणजे त्यानें अखंड चाळणा किंवा विवेक केला पाहिजे. परिभ्रमण करून जें मिळविलें असेल— ह्मणजे धान्य नव्हे, तर लोकस्थितीचें ज्ञान— त्याची चाळणा केली पाहिजे.

**कोण कोण राजी राखिले। कोण कोण मनीं भंगिले॥ १९-७-६,**

याची चाळणा केली पाहिजे. कोण लोक कसे आढळले याचा विचार करून ठेवला पाहिजे. कोण उपयोगीं पडतील, कोण विरुद्ध जातील अशी निवड करून ठेवावी आणि कार्यास लागावें. 'उद्यापासून आरंभ करूं' असें त्यानें केव्हां हि ह्मणूं नये, कारण

**नाहीं देहाचा भरवसा। केव्हां सरेल वयसा।**
**प्रसंग पडेल कैसा। कोण जाणे॥ १९-६-२५.**

यासाठीं विलंब न करितां प्रत्येक मनुष्यानें आपल्या हातून जेवढें कार्य होण्यासारखें असेल तेवढें पट्कन करून टाकावें व जें होण्यासारखें नसेल त्याविषयीं विचार करावा.

**आपणास जें जें अनकूळ। तें तें करावें तत्काळ।**
**होईना त्यास निवळ। विवेक उमजावा॥ १९-६-२७.**

या विवेकाचें महत्त्व फार आहे. समर्थ ह्मणतात, अशी कोणतीच अवघड किंवा अशक्य गोष्ट नाहीं कीं जी विवेकाच्या आटोक्यांत येऊन सुलभ व शक्य झाली नाहीं.

**विवेकामधें सांपडेना। ऐसें तों कांहींच असेना।**
**येकांतीं विवेक अनुमाना। आणून सोडी॥ १९-६-२८.**

एकांतांत विवेक केला ह्मणजे प्रत्येक गोष्ट सुकर आहे असें वाटतें, असें श्री-समर्थांचें ह्मणणें आहे. श्रीसमर्थांना एकांत फार प्रिय होता. ते ह्मणतातः—

**ज्ञानी आणी उदास। समुदायाचा हव्यास।**
**तेणें अखंड सावकास। येकांत सेवावा॥ १९-९-१.**

आपल्याला हें मोठें कोडें वाटतें. ज्याला समुदायाचा हव्यास असेल त्यानें एकांत सेवावा! याचा अर्थ काय? ज्याला समुदाय करावयाचा आहे त्याला एकांतांत राहून समुदाय कसा मिळेल अशी आपणांस शंका येते. एकांतांत, डोंगरांत राहून लोकसंग्रह कसा व्हावा? डोंगरांत लोक कोठचे? माझी खात्री नाहीं, पण मला याचा अर्थ कदाचित् असा वाटतो कीं, लोकसंग्रह करण्यास कोणते उपाय योजावे याचा विचार एकांतांत चांगला सुचत असेल ह्मणून श्रीसमर्थांनीं एकांत सेवण्यास सांगितलें असावें. कोणतेंही अवघड कार्य करा-

वयाचें असल्यास त्याची चाळणा करावी व एकांतावांचून चाळणा होत नाहीं, विचार सुचत नाहीं, ह्मणून एकांत सेवावा.

**अखंड तजवीजा चाळणा जेथें । पाहातां काय उणें तेथें ।**
**येकांतेंविण प्राणीयांतें । बुद्धि कैंची ॥ १९-६-२९.**

जो विचार करील आणि एकांतावांचून विचार नाहीं ह्मणून जो एकांत सेवील त्यास कोठेंही व कोणत्याही बाबतींत कांहींच घोटाळा नाहीं! आपल्या सारख्यांच्या अल्पबुद्धीला, संसारांतीलच सुखदुःखाच्या प्रसंगांबद्दल अहोरात्र चाळणा करण्याचा दृढ अभ्यास झालेल्या आमच्या मनाला, या बहुमोल उपदेशाचा अनुभव येवो किंवा न येवो, परंतु स्वतःच्या सामर्थ्याबद्दल श्रीसमर्थांना केवढा विश्वास होता तो, या वरील दोन चार ओव्यांवरून स्पष्ट होत आहे.

लोकसंग्रहार्थ समर्थांची जी शिकवण आहे तिचें **तिसरें अंग** ह्मणजे प्रयत्न किंवा साक्षेप हें होय. एकंदर दासबोध ग्रन्थ वाचून पाहिला ह्मणजे प्रत्येक वाचकाचा असाच ग्रह झाला पाहिजे कीं समर्थांनीं प्रयत्नवाद सांगितला आहे. उद्योगावांचून स्वस्थ बसून केवळ परमेश्वरावर हवाला टाकून कार्य साधेल असें त्यांनीं केव्हां हि सांगितलें नाहीं. कांहीं तरी प्रयत्न करावा, हें त्यांच्या एकंदर उपदेशाचें मुख्य धोरण आहे. प्रयत्नावांचून जगणारीं माणसें किंवा राष्ट्रें मृतप्राय समजावीं. एकदां श्रीसमर्थांना शिष्यांनीं प्रश्न केला कीं या जगांत असा भेद कां दिसून यावा? एक संपन्न कां आणि एक विपन्न कां? एक निर्मळ एक ओंगळ, एक राव एक रंक, एक उत्तम एक अधम, एक सुखी एक दुःखी, असा भिन्न भिन्न प्रकार कां असावा? याचें उत्तर 'प्रारब्ध' ह्मणून श्रीसमर्थांनीं दिलेलें नाहीं (१२–२–५, ६); तर ते ह्मणतातः—

**हे सकळ गुणापासीं गती । सगुण भाग्यश्री भोगिती ।**
**अवगुणास दरिद्रप्राप्ती । येदर्थीं संदेह नाहीं ॥ ९-४-४.**

राजा होणें किंवा प्रजा होणें हें आपणांवर, आपल्या गुणांवर, आपल्या कृतीवर अवलंबून आहे.

**आपलें स्वहित व कळे जना । तेणें भोगिती यातना ॥**

स्वहिताचा मार्ग न कळल्यामुळें अज्ञानी लोक दुःखांत दिवस कंठित बसतात, *दुसरें काय ? अज्ञान हें सर्व यातनांचें मूळ आहे. तरी पण,* शिष्य विचारतात, कीं महाराज, समजा असा एकादा मनुष्य आहे कीं, त्याला या जगांत कोणी नाहीं, सोयरे नाहींत धायरे नाहींत, इष्ट नाहीं, मित्र नाहीं, कोणी नाहीं; खावयास नाहीं, पांघरावयास नाहीं; सारांश निराश्रित, दुबळा, मूर्ख, आळशी, असा एखादा करंटा असला तर त्यानें काय करावें ? यावर

**लाहान थोर काम कांहीं । केल्यावेगळें होत नाहीं ॥ १२-९-६.**

असा सामान्य सिद्धांत सांगून

**ह्मणोन आळस सोडावा । येत्न साक्षपें जोडावा ।**
**दुश्चितपणाचा मोडावा । थारा बळें ॥ १२-९-८.**

असा प्रयत्न करण्याविषयीं उपदेश करून शेवटीं समर्थ उलट विचरतात कीं,

**घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।**
**तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ॥ १२-९-२९.**

मनांत आणील तर साऱ्या ब्रह्मांडाचें आकलन करण्याची शक्ति मनुष्यांत असतां त्याच्या ठिकाणीं करंटपण कां असावें, याचेंच मुळीं श्रीसमर्थांना नवल वाटतें ? ते विचारतात, हें करंटपण असतें तरी कसें? जो प्रयत्न करील तो करंटा कां राहील ?

**व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती ।**
**तेणें प्राणी सदेव होती । देखत देखतां ॥ १५-३-७.**

समर्थ ह्मणतात, तुह्मी पाहात आहां ना, कीं तुमच्या डोळ्यांदेखत तुमचे शेजारीपाजारी 'देखत देखतां' ३०।३०, ४०।४० वर्षांत वैभवाचें शिखर गांठतात ? कां, तर व्याप आटोप करिती आणि धके चपेटे सोसिती ह्मणून. हें प्रत्यक्ष दिसत असून हि कपाळावर नुसता हात मारून स्वस्थ बसणारे लोक मूर्ख नव्हत काय ?

**ऐसें हें आतां वर्ततें । मूर्ख लोकांस कळेना तें ।**
**विवेकी मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ १५-३-८.**

वरील एकंदर विवेचनांत सदैव होण्यास प्रयत्नाचीच अपेक्षा दर्शविली आहे. प्रयत्नांतीं परमेश्वर हें ह्मणणें बरोबर आहे, परतु हल्लीं आपणांस प्रयत्नापूर्वीच

परमेश्वरानें आपल्यासाठीं सर्व कांहीं करावें असें वाटूं लागलें आहे. परंतु समर्थ सांगतात:—

**कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं ।**
**केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥ १८-७-३.**

ईश्वरावर हवाला टाकून स्वस्थ बसण्याकडे मनाची जी प्रवृत्ति होत आहे तिला या ओवींत आधार सांपडत नाहीं. प्रयत्नाला कंटाळून चैनींत काळ कंठणें, हा पुरुषार्थ नव्हे. प्रयत्नाची अवश्यकता प्रपंच आणि परमार्थ या दोहींकडे सारखीच आहे.

**येहलोक अथवा परलोक। दोहिंकडे सारिखाचि विवेक॥१८-७-६**

प्रपंचांतली मुक्ति असो किंवा परमार्थांतली मुक्ति असो, कष्टावांचून ती प्राप्त होणार नाहीं. आपण कष्ट केल्यावांचून परमेश्वर आपणांस मुक्ति देणार नाहीं व शेजारीपाजारी ती आपणांस मिळवून देतील, ही हि आशा व्यर्थ होय. असें कधीं होत नाहीं. कष्ट करावे आपण व त्याचें फळ भोगूं द्यावें दुसऱ्याला, इतके मूर्ख किंवा परोपकारी अन्यत्र कोठें हि नाहींत. तेव्हां आपल्या मुक्तीसाठीं दुसरा कोणी धांवून येईल अशी आशा बाळगणें चुकीचें आहे. दुसऱ्याची आशा धरून प्रयत्न सोडणाराला श्रीसमर्थांनीं मूर्खांत काढला आहे. प्रपंचांत काय आणि परमार्थांत काय,

**जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला।**
**जो आपणचि कष्टत गेला। तोचि भला ॥ १९-९-१६.**

'जो आपणचि कष्टत गेला' ह्मटलें आहे, 'जो आपणचि बोलत गेला' असें चरण घातलेलें नाहीं.

**जेहिं उदंड कष्ट केले। ते भाग्य भोगून ठेले।**

व आपल्यासारखे

**येर ते बोलताचि राहिले। करंटे जन ॥ १८-७-१६.**

'करी थोडें बोले फार' तो मूर्ख समजावा. नुसती वटवट करण्यास श्रीसमर्थांचें अनुमोदन नाहीं. नुसत्या बडबडीनें मोक्ष मिळत नसतो.

**उगीच करिती बडबड। परी करून दाखवणें हें अवघड।**
**परस्थळ साधणें जड। कठिण आहे ॥ १५-६-२१.**

परस्थळ ह्मणजे मोक्षभुवन किंवा परस्थळ ह्मणजे शत्रूचा किल्ला, कोणता हि अर्थ घेतला तरी तें स्थळ नुसती बडबड करून कसें प्राप्त व्हावें ? त्याला प्रयत्न पाहिजे. फुशारकीच्या बडबडीवांचून प्रयत्न पाहिजे. पूर्वजांची कीर्ति गाऊं नये असें नाहीं, परंतु आपल्या हातून पूर्वजांना शोभेशी कांहीं कृति होत आहे कीं नाहीं याचा विचार केला पाहिजे. पूर्वजांची कीर्ति गाणें आणि स्वतः कांहीं न करणें यांत कांहीं मोठेपणा नाहीं.

**चौदा पीढ्यांचे पवाडे । सांगती ते शाहाणे कीं वेडे ।**
**ऐकल्यानें घडे कीं न घडे । ऐसें पाहावें ॥ १५-६-८.**

स्वदेश विपन्नावस्थेप्रत पोंचला असून व स्वतः त्या विपन्न स्थितीचा प्रत्यक्ष शांतपणें अनुभव घेत असून पूर्वजांच्या पराक्रमाची नुसती बढाई मारणें हा मूर्खपणा होय. ( २—१—१२ ) काय व्हावयाचें असेल तें होईल असें मानून नशिबावर हवाला टाकून स्वस्थ बसणें, हें शहाणपणाचें लक्षण नव्हे. 'नशीब' हा शब्द षंढांनीं व 'प्रयत्न' हा शब्द पुरुषांनीं उच्चारावा. ललाटरेखा देखील प्रयत्नानें पालटतां येईल.

**रेखा तितुकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येतें ।**
**डोळेझांकणी करावी ते । काये निमित्य ॥ १५-६-९.**

प्रयत्नवादाची येथें सीमा झाली. अशी ही समर्थांची तिसरी शिकवण आहे, तिचा विस्तार जितका करावा तितका करतां येणें शक्य आहे, कारण दासबोधांत प्रयत्नवादाचें प्रतिपादन किती तरी ठिकाणीं करण्यांत आलें आहे.

यापुढची **चवथी शिकवण** ह्मणजे मरणाविषयीं बेफिकीरपणा. मरण हें अपरिहार्य आहे, ह्मणून त्याची पर्वा न करतां स्वकर्तव्य करण्यास तत्पर असावें असें समर्थ शिकवितात. क्षणोक्षणाला मृत्यु जवळ जवळ येत चालला आहे.

**संसार ह्मणिजे सवेंच स्वार । नाहीं मरणास उधार ।**
**मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ॥ ३-९-१.**

मृत्यु कोणाला टाळतां आला नाहीं. जेवढे जन्माला आले तेवढे मेले. जन्माला यावयाचें याचाच अर्थ मृत्यूच्या मार्गाला लागावयाचें. कोणी वाट चालण्याला नुकती सुरवात केली आहे, कोणी अर्धी वाट चालून गेले आहेत, कोणी शेवटाला जाऊन पोंचले आहेत. मागें पाऊल कोणाचेंच पडत नाहीं. इच्छा असो वा नसो जें पाऊल पडतें तें

पुढेंच पडतें. सर्वांना एकच ठिकाण गांठावयाचें असतें. मृत्यूच्या भीतीनें पळून जाऊन कोठें लपून बसावें असें मनांत आणलें तरी मृत्यु हुडकून काढतो.

**मृत्याभेणें पळों जातां । तरी मृत्य सोडिना सर्वथा ।**
**मृत्यास न ये चुकावितां । कांहीं केल्या ॥ ३-९-२८.**

मग भिऊन तरी काय उपयोग? कसेंहि तरीं मृत्यु जर टळत नाहीं तर त्याला तोंड देऊन त्याच्याशीं सामना करणेंच बरें. कितीहि भित्रा प्राणी असो, तो उलटून पडला म्हणजे त्याचा पाठलाग करणारा थबकतोच. मरण, मरण, तें असें काय आहे? तें कोणाला येतें, शरिराला कीं आत्म्याला? शरिराला मरण आहे, आत्मा अमर आहे असें जर ज्ञान झालें तर मग मरणाची भीति ती कोठें उरली?

**आपणासी ठावचि नाहीं । जन्ममृत्य कैंचें कांई ॥ ६-२-३४.**

असा निर्धार झाला तर भ्यावयाचें कशाला? देशकार्य किंवा देवकार्य अडून राहिलें आहे कशामुळें? भीतीमुळें. विवेक करून ती भीतिच घालवितां आली तर मग कोणत्याही बिकट कार्याला हात लावण्यास कोण माघार घेईल?

**पुढें आशा धरूं नये । जीवित्वाची ॥ १४-१-१०.**

हा बोध जर मनांत उतरला, तर मग

**ऐसें जाणोनियां जीवें । येणें सार्थकचि करावें ।**
**जनीं मरोन उरवावें । कीर्तिरूपें ॥ ३-९-४४.**

अशी इच्छा कोणास झाल्यावांचून राहील?

कीर्तीची चाड ही याच्या पुढची शिकवण होय. कीर्तीसाठीं म्हणून कार्याला प्रवृत्त व्हावयास नको आहे, तर निस्पृहपणें कर्तव्याला सुरवात केली म्हणजे कीर्ति होतेच. कीर्तीसाठीं प्रयत्न केला तर कीर्ति होत नाहीं, पण निरपेक्षपणें स्वकर्तव्य बजाविलें म्हणजे नको म्हणत असतांही कीर्ति मागें लागते. कीर्ति फुकटची नाहीं.

**झिजल्यावांचुनी कीर्ति कैंची । मान्यता नव्हे कीं फुकाची ।**

टांकीचे घाव सोसल्यावांचून जसें देवपण येत नाहीं, तद्वत् कष्ट केल्याशिवाय मोठेपण मिळत नाहीं. स्वस्थ आरामशीर पडून राहून जर कीर्तीची माळ गळ्यांत पडती तर मग आपल्या पूर्वजांना इतकी दगदग नसती पडली;

परंतु सुखावर पाणी सोडल्याशिवाय कोणाचीही कीर्ति होत नाहीं. दोहोंपैकीं एक कांहीं तरी मिळेल. कीर्ति पाहिजे असल्यास सुख नाहीं, व सुख हवें असल्यास कीर्ति नाहीं.

**कीर्ति पाहों जातां सुख नाहीं । सुख पाहातां कीर्ति नाहीं ॥**

तात्पर्य, कीर्ति प्राप्त होण्याला किंमत फार पडते, ह्मणून आपण बहुतेक जण तिचा नाद सोडून देऊन स्वतःच्या सुखासाठींच धडपड करीत आहोंत; आणि इतकें करून हि सुख मिळत नाहीं तें निराळेंच. मग असें आहे तर खरोखर आपण देहममता सोडून देऊन कष्ट करण्यास कां न तयार व्हावें? मरणाची भीति विवेकानें दवडितां आली तर मनुष्य कष्ट करण्यासही मागें-पुढें पाहणार नाहीं. कोट्यावधी लोक जन्मास येतात आणि मरतात, परंतु कीर्ति केल्यावांचून जे मरतात त्यांचें जिणें व्यर्थ होय.

**कीर्ति करून नाहीं मेले । ते उगेच आले आणि गेले ।**
**शाहाणे होऊन भुलले । काये सांगावें ॥** १२-८-२७.

ह्मणून समर्थ ह्मणतात, कर्तव्याला जागा; नुसता बायकापोरांचा संसार करूं नका; स्वदेश, स्वधर्म स्मरा; कांहीं करून मरा, फुकट मरूं नका. समर्थ शिष्यांना विचारतात, कीं अशी कोणती शाश्वत सुखाची वस्तु या प्रपंचांत आढळली आहे कीं जिचा लोभ तुम्हांस सुटत नाहीं?

**येथील येथें अवघेंचि राहातें । ऐसें प्रत्ययास येतें ।**
**कोण काय घेऊन जातें । सांगाना कां ॥** १२-८-२८.

तात्पर्य, विषयाबद्दल वैराग्य उपजलें पाहिजे. जो विरक्त असेल तोच कांहीं राष्ट्रकार्य करूं शकेल. ह्मणून वैराग्य असावें ही समर्थांची **सहावी शिकवण** होय. अभ्यासानें आणि विचारानें वैराग्य प्राप्त होणें शक्य आहे. जे नैसर्गिक गुण आहेत त्यांची गोष्ट बाजूस राहो, परंतु शिकून येण्यासारखे जे गुण आहेत त्यांचा अभ्यास मुमुक्षूनें अगत्य केला पाहिजे.

**रूप लावण्य अभ्यासितां नये । सहजगुणास न चले उपाये ।**
**कांहीं तरी धरावी सोये । अगांतुक गुणाची ॥** १४-६-१.

हे आगंतुक गुण कोणते ते सर्व श्रीसमर्थांनी द. १४×१ त दिले आहेत. त्या गुणांचा अभ्यास करणें हें या सांप्रदायांत येऊं पहाणाराचें कर्तव्य आहे; असो. महंताच्या ठिकाणीं पूर्ण वैराग्य पाहिजे, एर्वी त्याच्या हातून लोकसंग्रह व्हावयाचा नाहीं. ज्यानें स्वार्थाचा त्याग केला नाहीं त्यानें परहित साधण्याचा

आव घालूं नये. आपण वैराग्य ह्मणून जें कांहीं समजतों, तीच कल्पना श्रीसमर्थांची नाहीं. जो अंगाला राख फांसून कांहीं करीत नाहीं तो विरक्त असें आपण समजतों, परंतु समर्थांनीं विरक्ताची व्याख्या निराळी केली आहे. विरक्ताबद्दल आपली विपरीत कल्पना इतकी दृढ होऊन बसली आहे, कीं ती सोडून देण्यासाठीं द० २४९ वाचकांनीं मुळावरूनच वाचावा, अशी शिफारस केल्याशिवाय मला गत्यन्तर नाहीं. उपाधिरहित तो विरक्त अशी आपली कल्पना कशावरून झाली आहे कोण जाणे, पण श्रीसमर्थ उलटें सांगतात कीं, विरक्तानें

**उपाधीसी विस्तारावें ।**

मात्र त्यानें

**उपाधींत न संपडावें ॥ ११-५-९.**

ह्मणजे झालें. सर्व प्रकारची उपाधी महंतानें करावी, परंतु आपण मात्र त्या उपाधींत गुरफटलें जाऊं नये.

**विरक्तें उपाधी करावी । आणी उदासवृत्ति न संडावी ॥२-९-२६.**

विरक्तानें सर्व कांहीं करावें, पण त्या कर्मांचा आपल्या ठिकाणीं लेप होऊं देऊं नये. कांहीं करावयाचें नाहीं असें तर नाहींच, पण उलट तो ह्मणजे कोणत्या कामांत नाहीं असें नसावें; मात्र तो सर्वत्र असूनही कोठेंच नाहीं असें लोकांना भासावें.

**आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठेंचि नाहीं ।**
**जैसा अंतरात्मा ठाईंचा ठाईं । गुप्त जाला ॥ ११-६-१४.**
**त्या वेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे ।**
**न दिसोन वर्तवीतसे । प्राणीमात्रांसी ॥ ११-६-१५.**

याचे नांव विरक्त. ही समर्थांची शिकवण आहे, कां हें त्यांनीं आपण होऊन आपलेंच चरित्र सांगितलें आहे, असा भ्रम पडतो. एकंदरींत विरक्त ह्मणजे तो, कीं जो आपल्या हातीं मुख्य सूत्र घेऊन साऱ्या समाजाला चालवितो. समर्थांनीं शिकविलेंच आहे कीं, महंतानें

**मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें ॥**

विरक्त ह्मणजे तर मग मोठा लबाड मनुष्य असला पाहिजे ? नव्हे, त्याला लबाड कसा ह्मणतां येईल? त्याला स्वतःला यांतलें काय पाहिजे असतें? एक

लंगोटी, एक कुबडी, एक माळ आणि एक झोळी इतक्या गोष्टी त्याला पुरे आहेत, यापेक्षां याच्या झोळींत सारें राज्य जरी कोणी अर्पण केलें तरी तें त्याला नको आहे. स्वदेश, स्वधर्म यांच्या कल्याणासाठीं त्याचा अवतार, तें कल्याण झालें म्हणजे त्याला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं. त्याच्या अवताराचा हेतुच हा, कीं तो लोकांना दिसावा होऊन लोकांनीं त्याच्या नादीं लागावें आणि त्याचें ऐकून स्वतःचें कल्याण करून घ्यावें.

**कोठेंच पडेना दृष्टीं । ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी ।**
**वाग्विळासें सकळ सृष्टी । वेधिली तेणें ॥ १९-९-२८.**

पण त्याला मात्र लोकांच्या कल्याणापरतो दुसरी लालुच नाहीं.

**जेथें तेथें नित्य नवा । जनासी वाटे हा असावा ।**
**परंतु लालचीचा गोवा । पडोंचि नेदी ॥ १९-६-२१.**

आणि म्हणूनच समर्थ शिष्यांना शिकवितात, कीं ज्याला लोकांची मनें आपलींशीं करून घ्यावयाचीं असतील त्यानें पूर्णपणें निस्पृह असलें पाहिजे.

निस्पृहता ही समर्थांची मातबर शिकवण होय. देशकार्य व देवकार्य याशिवाय महंताला निराळे स्वहित नसावें. प्रपंचाविषयीं त्यानें उदास असावें. स्वार्थ ज्याचा गेला त्यालाच परमार्थ साधेल. स्वार्थी मनुष्यानें परहिताचा कितीही आव घातला, तरी त्याला लोक मिळत नाहींत.

**उदासवृत्तीस मानवे जन ॥ १२-९-२६.**

म्हणून महंताला स्वार्थाची आसक्ती लवमात्र नसावी. मनुष्याला एक कोणता तरी अर्थ साधतो आणि म्हणून दोन्ही अर्थांसाठीं धडपड केल्यास एकही अर्थ पुरा साधत नाहीं. स्वार्थ न सुटेल तर परार्थ साधणार नाहीं. परार्थ साधण्यास स्वार्थत्याग पाहिजे. महंतानें लोकसंग्रहासाठीं परिभ्रमण करावयाचें, पण तें निस्पृहपणें केलें पाहिजे. परार्थाच्या नऊ दिवस बाता मारून दहाव्या दिवशीं हळूच स्वार्थाचें घोडें पुढें ढकललें, म्हणजे पहिल्या नऊ दिवसांची किंमत गेली म्हणून समजावें. कारण,

**स्वता निस्पृह असेना । त्याचें बोलणेंचि मानेना ॥ १९-६-३.**

श्रीसमर्थांच्या कार्याला अर्धवट माणसें नको होतीं. महंताची निस्पृहता लोकांच्या कसोटीला पूर्णपणें उतरली तरच लोक त्याच्या भजनीं लागतील. त्याच्या ठिकाणीं किंचित् जरी स्वार्थाची मळमळ लोकप्रत्ययास आली तरी

त्याच्या हातून मग कांहीं व्हावयानें नाहीं. महंताची निस्पृहता कडकडीत पाहिजे.

**उत्कट भव्य तेंचि घ्यावें। मळमळित अवघेंचि टाकावें।**
**निस्पृहपणें विख्यात व्हावें। भूमंडळीं॥** १९-६-१५.

यासाठी महंतानें

**मोलें कीर्तन करूं नये। कोठें तरी॥** १४×१.

मोल ठरवून किंवा मिळण्याच्या आशेनें त्यानें कीर्तन करूं नये इतकेंच नव्हे तर,

**दिल्या द्रव्य घेऊं नये.॥** १४×१.

त्याची दृष्टी असल्या क्षुद्र गोष्टीकडे नसावी. सामान्य लोकांच्या वरच्या पायरीवर त्यानें असलें पाहिजे. त्यानें

**परलोकीं वास करावा। समुदाव उगाच पहावा॥** १९-७-११

अशा प्रकारच्या वैराग्यशील आणि निस्पृह मनुष्यानें तेज समाजांत पडून त्याच्या वचनावर साऱ्या लोकांचा विश्वास बसून ते त्याच्या नादीं लागतील यांत काय आश्चर्य आहे ?

**निस्पृहें वगत्रुत्व सांडूं नये॥**

हें खरें, पण त्याचें वक्तृत्व नेहमीं प्रेमळ आणि मृदु असावें. आपल्या वाणीनें त्यानें कोणाच्याही अंतराला ढका लावूं नये हें त्यानें लक्षांत ठेविलें पाहिजे. ह्मणूनच महंताचें वचन मृदु असावें, अशी समर्थांची **आठवी शिकवण** आहे.

**जगामधें जगमित्र। जिव्हेपासीं आहे सूत्र॥** १९×२.

हें महंतानें विसरूं नये. देशासाठीं आणि धर्मासाठीं मिळतील तितके लोक मिळवावयाचे, हा आपल्या सांप्रदायाचा हेतु आहे, हें त्यानें अखंड हृदयांत वागवावें. असें झालें ह्मणजे कोणालाही आपल्या वाणानें दुखविण्याचें पाप महंत कां करील ? कठोर वचनाचा उपयोग शहाण्यावर केला तर कदाचित् अपाय व्हावयाचा नाहीं; परंतु शहाणा आणि वेडा असे दोघेही मृदु वचनानें जर आपल्याकडे वेधून घेतां येतात, तर मग कठोर वचनाचा उपयोग केव्हांच न करणें बरें नव्हे काय ? महंतानें

**नाना जनाचें हृदय। मृद शब्दें उकलावें॥** १९×२.

सर्वांनाच त्यानें आपल्या वचनानें निववावें. कोण केव्हां कामास येईल याचा कांहीं नेम नसतो, ह्मणून थोर असोत, लहान असोत, महंतानें सर्वांशींच प्रेमळ वर्तन ठेवावें. त्यानें

**उंच नीच ह्मणों नये । सकळांचें निववावें हृदय ॥** १९×२.

महंत हा कार्यैकदक् असला ह्मणजे साहजिकच त्याच्या मुखांतून केव्हांहि मर्मभेदक उद्गार निघणार नाहींत. दुसऱ्याचें दुःख पाहून साहजिकच त्याला दुःख वाटेल. दुसऱ्याचा आनंद तोच याचा आनंद. श्रीसमर्थ शिकवितात:—

**दुसऱ्याच्या दुःखें दुःखवावें । परसंतोषें सुखी व्हावें ।**
**प्राणिमात्रांस मेळऊन घ्यावें । बऱ्या शब्दें ॥** १२-१०-७.

लोकांना हिडिस फिडिस करून ते थोडेच आपणांकडे येणार आहेत? यासाठीं

**वेड्यास वेडें ह्मणों नये । वर्म कदापि बोलों नये ।**
**तरीच घडे दिग्विजये । निस्पृहासी ॥** १३-१०-२६.

महंताचें वचन जसें मृदु असावें तसेंच त्याचें आचरण क्षमा आणि शांति यांनीं युक्त असावें. महंताच्या ठिकाणीं क्षमा, शांति, सहिष्णुता हे गुण असले पाहिजेत अशी समर्थांची **नववी शिकवण** आहे. महंत क्षमाशील असावा. त्यानें

**अन्यायें थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥** ११-५-५.

त्याच्या ठिकाणीं राग नसावा. या रागाच्या योगानें मित्र देखील शत्रु बनतात असा जगाचा अनुभव आहे. यासाठीं महंतानें

**कदापि रागास न यावें । क्षमारूपें ॥** १२-१०-१०.

राग येण्यासारख्या प्रसंगीं देखील त्यानें शांति धरावी.

**उदंड धिःकारून बोलती । तरी चळों नेदावी शांति ।**
**दुर्जनास मिळोन जाती । धन्य ते साधु ॥** १२-१०-१६.

खरें आहे, दुसऱ्यानें धिःकार केला ह्मणून महंताची शांति कां ढळेल? ज्याला व्यर्थ मानापमानाची पर्वा असते त्याचें हें पाहाणें आहे, परंतु महंताला श्रीसमर्थांनीं शिकविलें आहे कीं,

**कांहीं मान इच्छूं नये । कोठें तरी ॥** १४×१.

मग दुसऱ्यानें आपला धिःकार केल्याचें सुखदुःख कोठें उरलें?

**धिःकारिल्या धिःकारेना । तोचि माहापुरुष ॥ १९-४-२५.**

याचें तात्पर्य असें कीं, आपण याचा इतका धिःकार करीत असूनही हा शांत तो शांत, असें पाहून लोकच उलटे ओशाळतात, ते विचार करूं लागतात, त्यांना पश्चात्ताप होतो व अखेरीस ते त्याला भजूं लागतात. ह्मणून समर्थांनीं शिकविलें आहे कीं,

**धके चपेटे सोसावे । नीच शब्द साहात जावे ।**
**प्रस्तावोन परावे । आपले होती** ॥ १५-६-२२.

ह्या सर्व शिकवणींत येथून तेथून श्रीसमर्थांचें एक धोरण आहे. हरिकथा निरूपण आणि राजकारण हीं दोन सांप्रदायाचीं अंगें असल्यामुळें व उभय पक्षीं लोकसंग्रहाची अपेक्षा असल्यामुळें महंताला समर्थांनीं जें शिकविलें आहे तें एकच हेतु धरून होय. तो हेतु ह्मणजे एवढाच कीं महंताच्या ठिकाणीं असे गुण असावेत कीं जेणेंकरून त्याला पुष्कळ लोक येऊन मिळतील.

**जो बहुतांचें सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना ॥ ११-५-१८.**

ह्मणून महंताच्या ठिकाणीं सहिष्णुता पाहिजे. ह्मणून त्यानें

**बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥**
**स्वयें आपण कष्टावें । बहुतांचें सोसित जावें ।**
**झिजोन कीर्तीस उरवावें । नाना प्रकारें** ॥ १२-१०-१८

ह्याच शिकवणीला अनुसरून श्रीसमर्थ सांगतात, कीं लोकांच्या उपयोगीं पडण्याचा कोणताही प्रसंग महंतानें फुकट दवडूं नये.

परोपकार करणें ही समर्थांची **दहावी शिकवण** होय.

**नरदेह हा स्वाधेन । सहसा नव्हे पराधेन ।**
**परंतु हा परोपकारीं झिजऊन । कीर्तिरूपें उरवावा ॥ १-१०-२५**

परोपकारास तत्पर असणें हें सत्वगुणाचें द्योतक आहे. परोपकार कोणावर करावा आणि कोणावर करूं नये असा भेदाभेद नाहीं. दुर्जनावर देखील परोपकार करून त्यांना आपल्या कार्याकडे ओढावें.

**शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ॥**
**उणें पडों नेदावें । कोणियेकाचें** ॥ १२-१०-५.

दुसऱ्यांना आत्मवत् मानून त्यांच्या कार्याला आपण तत्पर राहिल्यास साहजिकच ते आपल्या कार्याला येतील. कोणावर कसाहि बरा वाईट प्रसंग आल्यास त्यावेळीं त्याच्या मदतीला धांवून जाणें हें महंताचें काम आहे. प्रसंगीं तोंड लपविणें हें योग्य नव्हे. चांगल्या प्रसंगीं शेंकडों लोक जमतात, पण एखाद्यावर वाईट प्रसंग आल्यास त्यावेळीं मात्र त्याचे भरंवशाचे इष्टमित्र देखील लपवालपवी करितात. अशा प्रसंगीं महंतानें त्याच्या कामास जाण्यास चुकूं नये.

**आपलें अथवा परावें। कार्य अवघेंच करावें।**
**प्रसंगीं कामास चुकवावें। हें विहित नव्हे ॥** १२-१०-२१

सांप्रदायाचीं एकंदर लक्षणें देण्यात समर्थांचा जो मुख्य हेतु तो ह्या परोपकाराच्या शिकवणींत देखील आहे. परोपकार कां करावा, प्रसंगीं दुसऱ्याच्या उपयोगीं पडावें तें कां? परोपकार अशासाठीं करावयाचा व लोकांच्या बऱ्यावाईट प्रसंगीं अशासाठीं उपयोगीं पडावयाचें कीं, त्यांनीं आपल्या कामाला येऊन मिळावें.

**आपल्या कार्यास तत्पर। लोक असती लाहानथोर।**
**तैसाचि करी परोपकार। मनापासुनी ॥** १९-४-२२

उत्कटता ही समर्थांची शेवटची ह्मणजे **अकरावी शिकवण** होय. ही शिकवण येथवर दिलेल्या दहा शिकवणींपासून निराळी नाहीं. श्रीसमर्थांचें आपल्या शिष्यांना इतकेंच सांगणें आहे, कीं जगदुद्धारार्थ भिक्षेकऱ्याचा वेष पतकरून परिभ्रमण करणाऱ्याच्या ठिकाणीं कोणता ना कोणता तरी एखादा गुण उत्कट रीतीनें वसत असला पाहिजे. कोणत्या तरी एखाद्या गुणाची महंताच्या ठिकाणीं पराकाष्ठा झाली पाहिजे. तरच लोक

**तया माहांपुरुषाकारणें। धुंडीत येती ॥** १२-१०-३१.

श्रीसमर्थ शिकवितात,

**उत्कट भक्ति उत्कट ज्ञान। उत्कट चातुर्य उत्कट भजन।**
**उत्कट योग अनुष्ठान। ठाईं ठाईं ॥** १९-६-२२.
**उत्कट निस्पृहता धरिली। त्याची कीर्ति दिगांतीं फांकली।**
**उत्कट भक्तीनें निवाली। जन मंडळी ॥** १९-६-२३

भक्ति किंवा ज्ञान किंवा चातुर्य किंवा भजन किंवा योग किंवा अनुष्ठान किंवा

निस्पृहता किंवा दुसरा कोणताही एखादा गुण, यांपैकीं कोणत्या तरी निदान एका गुणाचा महंताच्या ठिकाणीं अगदीं कडेलोट झाला पाहिजे. कोणताही एकच गुण उत्कट रीतीनें एखाद्याच्या अंगीं असला तरी अशा पुरुषासंबंधानें लोकांना आदर वाटत असतो, मग सर्वच गुणसमुच्चयानें ज्याच्या ठिकाणीं वास करतील तो साऱ्या राष्ट्राला हालवील यांत काय आश्चर्य आहे! हे सर्व गुण श्रीसमर्थांच्या ठिकाणीं होते, हें मी महाराष्ट्रवाचकांस सांगावयास नको आहे. ज्यांच्या ठिकाणीं या गुणांपैकीं एक किंवा अधिक गुण वास करितात अशांच्याच हातून कांहीं तरी राष्ट्रकार्य किंवा धर्मकार्य होत असतें, नाहींपेक्षां यांपैकीं अंगीं कोणताही गुण नसून नुसती सदिच्छा धरून देशभर भटकण्यांत कोणीं सारें आयुष्य जरी खर्चे केलें तरी त्यापासून कोणाचेंही कल्याण होण्याचा संभव नाहीं. देशासाठीं किंवा धर्मासाठीं ज्यांच्या शुद्ध अंत:करणामध्यें कांहीं कांहीं उच्च व पवित्र इच्छा स्फुरण पावत असतात त्यांनीं लक्षांत ठेवावें कीं,

**कांहीं येक उत्कटेंविण। कीर्ति कदापि नव्हे जाण।**
**उगेंच वणवण हिंडोन। काये होतें॥ १९-६-२४.**

असा हा रामदासी सांप्रदाय आहे. सांप्रदायाच्या ह्या सर्व किंवा कांहीं लक्षणांनीं युक्त असा महंत असला, ह्मणजे

**नभामाजी तारांगणें। तैसे लोक॥ १२-९-२७.**

त्याच्या भोंवतीं गोळा होतील. हें कार्य सर्वांनाच साधतें असें नाहीं; परंतु जो महंत ह्मणजे मठपति आहे त्याच्या ठिकाणीं तरी समुदाय करण्याची क्षमता असली पाहिजे. ज्याला समुदाय करण्याची अक्कल नसेल त्यानें मठपति होऊं नये, परंतु आपल्या ठायीं कार्यक्षमता नसतांही पोकळ डौल घालून सांप्रदायाला कमीपणा आणणें बरें नव्हे.

**अभ्यासें प्रगट व्हावें। नाहीं तरी झांकोन असावें।**
**प्रगट होऊन नासावें। हें बरें नव्हे॥ १९-७-१७.**

जो महंत ह्मणून ह्मणवील त्याला लोक सांभाळतां आले पाहिजेत. तसें ज्यांच्यानें होत नसेल त्यानें महंत, मठपति, पुढारी ह्मणून मिरवूं नये, आपल्या एकट्याचेंच जें काय पारमार्थिक कल्याण करून घेणें असेल तेवढेंच त्यानें करावें.

**तस्मात् लोकिकीं वर्ततां नये। त्यास महंती कामा नये।**
**परत्र साधनाचा उपाये। श्रवण करून असावें॥** १९-७-१५.

आपल्याला उपाधी होत नाहीं, तर आपण उपाधींत पडूं नये, परंतु आपल्या योग्यतेबाहेरचें काम करण्याचा आव घालून स्वतःला आणि लोकांना विनाकारण कष्टी करूं नये. ( १९X८ ) स्वदेश व स्वधर्म यांना कोणती स्थिति प्राप्त झाली आहे याचें ज्ञान महंताला पाहिजे व ती सुधारण्याचा मार्ग इतरांना त्यानें आंखून दिला पाहिजे. फार काय सांगावें, महंताला ह्मणजे कांहीं ठाऊक नाहीं असें नसावें.

**ऐसा जाणे जो समस्त। तोचि महंत बुद्धिवंत॥ ११-६-७.**

श्रीसमर्थांची ही एकंदर शिकवण जो अनुसरील तोच महंत.

**हे सिकवण धरितां चित्तीं। सकळ सुखें वोळगती।**
**आंगीं बाणे महंती। अकस्मात॥** १४-१-८०.

जो महंत आहे त्यानें दुसरे महंत करून त्यांना अशा प्रकारच्या युक्तिबुद्धीनें भरून

**जाणते करून विसरावे। नाना देसीं॥**

हें जें कार्य श्रीसमर्थांनीं स्वतः केलें व आपल्या शिष्यांना शिकविलें तें एका ठिकाणीं संकलित करून साररूपानें महाराष्ट्रवाचकांना सादर केलें आहे.

अशा प्रकारें श्रीसमर्थांच्या देखरेखीखालीं तयार झालेले त्यांचे हजारों शिष्य सर्व महाराष्ट्रभर किंबहुना सर्व देशभर जेव्हां संचार करीत होते, तेव्हां त्यांनीं राष्ट्राची केवढी कामगिरी बजावली असली पाहिजे! इतिहासांत, बखरींत, किंवा चरित्रांत या गोष्टी दिलेल्या नाहींत, परंतु श्रीसमर्थांचें चरित्र आणि त्यांची शिकवण इत्यादिकांचा विचार केला असतां समर्थांचे सारे शिष्य ह्मणजे स्वदेश–स्वधर्म–स्वबांधव यांच्या कल्याणासाठीं, यांच्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणासाठीं, जगाच्या उद्धारासाठीं सर्वत्र संचार करणारे श्रीसमर्थांचे दूत होत, असें अनुमान काढण्यास वाचकांस कठिण जाऊं नये असें वाटतें.

**जेथें अखंड नाना चाळणा। जेथें अखंड नाना धारणा।**
**जेथें अखंड राजकारणा। मनासी आणिती॥** १९-१०-१.

अशा सद्गुरूंच्या सान्निध्यांत राहून राष्ट्रसेवा करणारे किती भाग्यवान् होत! काय मौज असेल ती! मध्यें सद्गुरु आणि शेंकडों शिष्य भोंवताली असून

जेव्हां स्वारी संचार करण्यास, गांवांतून काय आणि अरण्यांतून काय , निघत असेल तेव्हां त्या सर्व शिष्यांचीं अंतःकरणें स्वदेश–स्वधर्म यांच्या प्रेमानें किती उचंबळून जात असतील ! स्वतःच्या प्रापंचिक सुखदुःखाची कोणालाच काळजी नव्हती. आपल्या उपासनेच्या नांवाखालीं सर्वत्र परिभ्रमण करणारे श्रीसमर्थ त्यावेळीं महाराष्ट्रांत कोणाला माहित नसतील असें वाटत नाहीं.

**उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे ।**
**भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ १९-१०-८.**

हजारों लोक त्यांच्या दर्शनास येत असत व तितक्यांच्या अंतःकरणाची परीक्षा करून श्रीसमर्थ त्यांना युक्तिबुद्धीच्या गोष्टी सांगत.

**जितुकें कांहीं आपणासी ठावें । तितुकें हळुहळु सिकवावें ।**
**शाहाणे करून सोडावे । बहुत जन ॥ १९–१०–१४.**

परंतु खुद्द समर्थांचा शिष्यसमुदाय केवढा आहे आणि ते सर्व काय करितात याची कल्पना लोकांस नसे.

**किती लोक तें कळेना । किती समुदाव आकळेना ।**
**सकळ लोक श्रवणमनना । मधें घाली ॥ १९–१०–११.**

परिभ्रमण करितांना श्रीसमर्थ आपल्या बरोबर अशक्त शिष्य घेत नसत. उघडच आहे, त्यांची स्वारी निघावयाची ह्मणजे थोडीच अगदीं नेमक्या वेळेला, नेमक्या मार्गानें आणि नेमक्या ठिकाणीं जावयाची. त्यांचा मामला धकाधकीचा असे.

**धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ।**
**नाना बुद्धी शक्ताला । ह्मणोनि सिकवाव्या ॥ १८–१०–२२.**

असे सशक्त शिष्य बरोबर घेऊन स्वारी निघावयाची. एकाच ठिकाणीं फार दिवस तळ देऊन ते राहत नसत.

**जुन्या लोकांचा कंटाळा आला ।**
**तरी नूतन प्रांत पाहिजे धरिला ॥ १९-१०-१८.**

त्या कामीं त्यांना आळस मुळींच खपत नसे. महंतानें आळस केला ह्मणजे त्याची महंती बुडाली ह्मणून समजावें.

**देह्याचा अभ्यास बुडाला । ह्मणिजे महंत बुडाला ।**

यासाठीं आळस न करतां

**लागवेगें नूतन लोकांला । शाहाणे करावें ॥ १९-१०-१९.**

समर्थांनीं ठिकठिकाणीं आपल्या शिष्यांकरवीं मठ स्थापन केले व त्या शिष्यांनीं आपआपल्यापरी तोच कित्ता गिरविला.

**लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।**
**भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ १५-२-२६.**

श्रीसमर्थांचें जें सामर्थ्य तें यांतच आहे. सर्व महाराष्ट्राला त्यांनीं एक केलें. एकाच इच्छेनें सर्व महाराष्ट्राला त्यांनीं उद्दीप्त केलें. एकाच कार्याकडे सर्व महाराष्ट्राचें लक्ष त्यांनीं वेधून घेतलें. श्रीरामदासस्वामी यांना समर्थ कां ह्मणत, याविषयीं अनेकांचे अनेक तर्क आहेत. कोणी ह्मणतात, दासपंचायतनांत ते सर्वांहून वडिल होते ह्मणून त्यांना समर्थ ह्मणत; कोणी ह्मणतात, कीं, ते भिक्षेला निघाले ह्मणजे " जय जय रघुवीरसमर्थ " असा श्रीरघुवीराचा जयजयकार करीत ह्मणून त्यांना लोक समर्थ ह्मणूं लागले. असे अनेकांनीं अनेक तर्क केले आहेत. या प्रश्नाचा निकाल नुसत्या तर्कानें लावावा ही गोष्ट मला इष्ट वाटत नाहीं. शिवाय असें कीं, असा तर्क करण्याचें कारणही नाहीं. समर्थपदवी कोणाला प्राप्त होते हें श्रीरामदासांनींच दासबोधांत एके ठिकाणीं सांगून ठेवलें आहे. " समर्थ " शब्दाची उपपत्ति त्यांनींच दिलेली असल्यावर त्याहून निराळी उपपत्ति बसविण्याचा आपणास काय अधिकार आहे ?

**जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थांचें लक्षण ॥ १९-४-२१.**

असें एका ठिकाणीं मोघम सांगून दुसरीकडे ते ह्मणतातः—

**बहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी ।**
**ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होते ॥ १८-१०-४६.**

जो समाजाच्या सुखदुःखाचीं सूत्रें आपल्या हातीं धरून साऱ्या समाजाला चालवितो, कार्याकडे प्रवृत्त करितो व सन्मार्गावर आणून सोडतो, तो समर्थ. समर्थ ही पदवी त्याला मिळते. श्रीरामदासस्वामींनीं अखिल महाराष्ट्रामध्यें चलन उत्पन्न करून

**ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या ।**
**संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥ १९-६-१४.**

या उपदेशाप्रमाणें आपण स्वतः कृति केली, ह्मणून त्यांना समर्थ ह्मणत, असें अनुमान काढणें वरील समर्थोक्तीवरून अपरिहार्य आहे असें वाटतें.

अशा प्रकारें चाफळखोऱ्यामध्यें जगदुद्धाराचें कार्य समर्थांनीं चालविलें असतां ही बातमी श्रीशिवाजी महाराजांना लागली व त्यांनीं त्यांची अति प्रयासानें भेट घेतली.

ही भेट चाफळखोऱ्यांत शिंगणवाडीस एका औदुंबराच्या वृक्षाखालीं झाली अशी दंतकथा आहे. त्या प्रसंगीं शिवाजी महाराजांना समर्थांनीं जो उपदेश केला तो "लघुबोध" या नांवानें प्रसिद्ध आहे. तोच दासबोधाच्या १३ व्या दशकाचा ६ वा समास होय. हा बोध अध्यात्मपर आहे. यांत सारासारविचार सांगून प्रत्ययज्ञानाचें महत्त्व दाखविलें आहे. या समासांतील शेवटची ओवी समजली तरी देखील पुष्कळ आहे. ती ओवी अशीः—

**ह्मणोनि ज्ञाता धन्य धन्य। जो निर्गुणेसीं अनन्य।**
**आत्मनिवेदनें मान्य। परम पुरुष॥** १३–६–३१.

राजकारणपर जो कांहीं उपदेश ठिकठिकाणीं दासबोधांत आला आहे तो सर्व एकट्या श्रीशिवाजी महाराजांकरितांच आहे असें ह्मणतां येणार नाहीं; कारण राजकारण करणें हें या संप्रदायाचें एक अंग असल्यामुळें राजकाणाविषयींचा उपदेश एकंदर शिष्यवर्गास श्रीसमर्थांनीं केलेला आहे असेंच मानणें योग्य होणार आहे. हें माझें ह्मणणें खरें असेल तर यापासून इष्ट असें एक अनुमान निघतें. शिष्यांच्या ठिकाणीं राजकारणपर उपदेश ऐकण्याची पात्रता असल्यावांचून कांहीं तो उपदेश समर्थांनीं त्यांना केला नाहीं; तेव्हां अशा प्रकारचा उपदेश ऐकण्याची पात्रता समर्थांच्या शिष्यांना व त्यावेळच्या महाराष्ट्रीयांना होती असें मानणें भाग आहे.

राजकारणपर जेवढा उपदेश आहे तेवढा कोणा एका विशिष्ट शिष्यास अनुलक्षून नसून तो सामान्यपणें सर्वांनाच अनुलक्षून आहे हें खरें, तथापि द० १८×६ हा समास केवळ श्रीशिवाजी महाराजांकरितांच दिसतो.

**बरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजा भोवानी।**
**परंतु विचार पाहोनी। कार्य करणें॥** १८–६–९.

ईश्वरानें व विशेषतः तुळजाभवानीनें तुमचा पतकर घेतला आहे, ती तुह्मांस अंगीकृत कार्यांत यश देईल, तथापि तुह्मी आपल्याकडून जें करणें तें विचारानेंच केलें पाहिजे. ही ओवी शिवाजी महाराजांशिवाय दुसऱ्या कोणास अनुलक्षून असणार? तुळजाभवानी ही श्रीशिवाजी महाराजांचीच

विशेष अभिमानी होती आणि ह्मणून ही ओवी व हा समास केवळ शिवाजी महाराजांनाच अनुलक्षून आहे. हा समास फार गोड आहे. तो वाचकांनीं मुळावरूनच वारंवार वाचावा. श्रीसमर्थ व शिवाजी महाराज यांचें परस्पर प्रेम या समासावरून व्यक्त होत आहे. शिवाजी महाराजांना देशकार्यांत यश येत चाललेलें पाहून समर्थांच्या अंत:करणांत जें प्रेम उचंबळत असलें पाहिजे तें उद्गाररूपानें या समासांत बाहेर पडलें आहे. या समासांत एक ओवी अशी आहे:—

**म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिवसांचे माजले बंड ।**
**याकारणें अखंड । सावधान असावें ॥** १८–६–१२.

ह्या ओवींत समर्थांनीं शिवाजी महाराजांना अखंड सावधान असण्याविषयीं उपदेश केला आहे. त्याचें कारण त्यांनीं असें दिलें आहे कीं, म्लेंछ लोक फार दिवसांचे मातले आहेत, तेव्हां त्यांची रग जिरविणें सामान्य गोष्ट नव्हे. म्लेंछ लोक त्यावेळीं राज्यपद पावले होते. त्यांच्या सत्तेला समर्थांनीं बंड ह्मटलें आहे, अर्थात् ती सत्ता झुगारून स्वराज्य स्थापण्याच्या इच्छेनें कोणीं हातीं तरवार घेतली असती तर त्याच्या कृतीला—मग तींत यश येवो वा न येवो--समर्थांनीं बंड ह्मटलें नसतें. अफझुलखानाच्या वधानंतर शिवाजीमहाराज श्रीसमर्थांना भेटावयास गेले होते, त्या वेळचा हा समास आहे, अशी दंतकथा आहे. ही दंतकथा खरी असावी असें वाटतें. साग्र समास वाचल्यावर ही कल्पना दृढ होते. अफझुलखानाच्या भेटींतून शिवाजीमहाराज यश संपादून आले ही गोष्ट लहानसहान नव्हती, आणि ह्मणूनच "देणें ईश्वराचें" असें चरण घालून, त्या प्रसंगाचें महत्व श्रीसमर्थांनीं दर्शविलें आहे. किंबहुना शिवाजी महाराजांचें अशा बिकट प्रसंगीं रक्षण केल्याबद्दल श्रीसमर्थांनीं या समासांत माहाराजांना उपदेश करतां करतां ईश्वराचें उपकार आठविले आहेत. महाराजांना अफझुलखानाच्या अंतराची बरोबर कल्पना झाली होती, याला अनुसरूनच

**परीक्षिणें परांतर । देणें ईश्वराचें ॥**

हीं दोन चरणें नाहींत काय ? आणि अफझुलखानासारखा बलवान् कपटमती दगा करावयास आला असतां त्याची एकट्याची भेट घेण्याचें ठरवून महाराजांनी जें अद्भुत कार्य केलें त्याची प्रशंसा

**माहां यत्न सावधपणें । समई धारिष्ट धरणें ।**
**अद्भुतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥**

या ओवीमध्यें स्पष्टपणें केलेली नाहीं काय? असो.

याशिवाय श्रीमत् दासबोधांत जीं चातुर्यलक्षणें कित्येक ठिकाणीं दिलीं आहेत, त्यांतही राजकारणाविषयीं उपयुक्त असा कांहीं भाग आहे. समर्थांच्या या शिकवणीचा शिवाजीमहाराजांच्या मनावर केवढा परिणाम झाला असला पाहिजे, याची कल्पना आपल्या सारख्यांना हल्लींच्यासारख्या काळांत कोठून होणार आहे? समर्थांचे चालण्यांत, समर्थांचे पाहण्यांत, समर्थांचे बोलण्यांत, किती तरी सामर्थ्य असलें पाहिजे? शिवाजीमहाराजांना स्वीकारलेल्या कार्यांत समर्थांच्या सल्लामसलतीचा किती तरी उपयोग झाला असला पाहिजे. साताऱ्याहून चाफळ जरा लांब पडे, मनांत येतांच श्रीसद्गुरुदर्शनाचा लाभ घेतां येत नव्हता, ह्मणून शिवाजीमहाराजांनीं विनंती केल्यावरून श्रीसमर्थ परळीस येऊन राहिले. ते तेथें राहावयास आल्यानंतर त्यांच्या भेटीला व दर्शनाला हजारों साधुसंतांचे मेळे येत आणि ह्मणूनच तेव्हांपासून परळीस "सज्जनगड" असें नांव मिळालें.

श्रीशिवाजीमहाराजांनीं आपलें चरित्र शके १६०२ चैत्र शुद्ध १५ स संपविलें व श्रीसद्गुरु समर्थ रामदासस्वामी यांनीं सज्जनगडावर शके १६०३ च्या माघ वद्य नवमीस आपल्या अवताराची समाप्ति केली. सज्जनगडावर श्रीसमर्थांची समाधी आहे व माघ व० १ पासून तों व० ९ पर्यंत पुण्यतिथीप्रीत्यर्थ गडावर मोठा उत्सव होत असतो. या उत्सवाकडे महाराष्ट्रीयांचें व तरुण देशभक्तांचें विशेष लक्ष लागावें अशी माझी फार इच्छा आहे. उत्सवाशिवाय इतर दिवसांत समाधीपुढें भजनपूजन, मननानिदिध्यास करण्यास पुष्कळ एकांत सांपडतो. "तेथें जागृत रामदास विलसे" असा पुष्कळांचा अनुभव आहे.

**जया स्वहित करणें । श्रीरामदास भजनीं लागणें ।**
**अंतरीं स्वरूपानुसंधानें । वागत जावें ॥**
**रामदास चौ अक्षरी । मंत्र जपावा निर्धारीं ।**
**रामध्यान जडे अंतरीं । प्राणीयाचे ॥**

असा सप्रचीत उपदेश पुष्कळांनीं केलेला आहे. आपणांस अनुभव नाहीं ह्म-

णून इतरांचा अनुभव खोटा असें ह्मणतां येत नाहीं. आपण शुद्ध, प्रेमळ, भाविक अंतःकरणानें अनुभव घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

येथें आशंका उठिली । ज्ञात्याची समाधी पूजिली ।
तेथें कांहीं प्राचित आली । किंवा नाहीं ॥ १०-६-३८.

अशी शंका शिष्यानें घेतल्यावरून द० १०×७ त या शंकेचें श्रीसमर्थांनीं उत्तर दिलें आहे.

तरी हा लोकांचा भावार्थ । भाविकां देव येथार्थ ।
अन्नेत्र कल्पना वेर्थ । कुतर्काची ॥ १०-७-७.

भाविक जशी कल्पना करील तसा त्याचा देव आहे. अवतारी पुरुष होऊन गेले, परंतु ते अजून आहेत.

पूजा घेताती प्रतिमा । आंगा येतो अंतरात्मा ।
अवतारी तरी निजधामा । येऊन गेले ॥ ११-९-९.
परी ते निजरूपें असती । तें निजरूप तें जगज्जोती ।
सत्वगुण तयेस ह्मणती । जाणतीकळा ॥ १०.
तये कळेचे पोटीं । देव असती कोट्यानुकोटी ।
या अनुभवाच्या गोष्टी । प्रत्ययें पाहाव्या ॥ ११.

ह्या आपल्या अनुभवाच्या गोष्टी आहेत, कोणास शंका येत असेल त्यानें प्रत्यय घेऊन पहावा असें श्रीसमर्थ सांगत आहेत, त्यावर विश्वास ठेऊन पुढील उपदेश ऐकावा.

येक गुरु येक देव । कोठें तरी असावा भाव ।
भावार्थ नस्तां वाव । सर्व कांहीं ॥ १०-७-१५.
निर्गुणीं ज्ञान जालें । ह्मणोन सगुण अलक्ष केलें ।
तरी ते ज्ञाते नागवले । दोहिकडे ॥ १६.
नाहीं भक्ति नाहीं ज्ञान । मधेंच पैसावला अभिमान ।
ह्मणोनियां जपध्यान । सांडूंच नये ॥ १७.
सांडील सगुण भजनासी । तरी तो ज्ञाता परी अपेसी ।
ह्मणोनियां सगुणभजनासी । सांडूंच नये ॥ १८.
कामनेनें फळ घडे । निःकाम भजनें भगवंत जोडे ।
फळभगवंता कोणीकडे । महदांतर ॥ २०.

**भक्तें जें मनीं धरावें । तें देवें आपणचि करावें ।**
**तेथें वेगळें भावावें । नलगे कदा ॥ २३.**
**दोनी सामर्थ्यै येक होतां । काळास नाटोपे सर्वथा ।**
**तेथें इतरांची कोण कथा । कीटकन्यायें ॥ २४.**

यापेक्षां समर्थांनीं ज्यास्त काय सांगावयास पाहिजे आहे?

जन्मापासून समाधीपर्यंत श्रीसमर्थांचें चरित्र श्रीमत् दासबोधांतून जितकें सांगतां आलें तितकें यथामति सांगितलें आहे. महाराष्ट्राला पुढील मार्ग क्रमण्यास मार्गदर्शक असें समर्थांचें चरित्र आहे. १२ वर्षें पुरश्चरण व १२ वर्षें तीर्थयात्रा मिळून २४ वर्षें भगवत्प्रास्यर्थ खर्ची घातल्यानंतर जगदुद्धाराचें काम श्रीसमर्थांनीं आरंभिलें. यांत जो बोध आहे तोच बोध त्यांनीं दासबोधांतही केलेला आहे. समर्थ ह्मणतातः—

**सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।**

जो जो कोणी चळवळ करील त्याच्या त्याच्या ठिकाणीं सामर्थ्य आहे, असें समर्थ ह्मणतात. आपला अनुभव असा आहे काय ? चळवळी करकरून आपल्या जिभा कोरड्या पडण्याची वेळ आली तरी कोणी आमच्या चळवळींना यत्किंचित् सुद्धां भीक घालीत नाहीं ! अलिकडे अलिकडे तर आमच्या चळवळींचें दुर्बलत्व ज्यास्तच भासूं लागलें आहे ! असें कां व्हावें ? जो कोणी चळवळ करील त्याच्या ठिकाणीं सामर्थ्य आहे असें समर्थ ह्मणत असूनही आह्मांला विपरीत अनुभव कां यावा ? काय, समर्थांचा सिद्धांत चुकला ह्मणावयाचें ? नव्हे, सदरहु ओवीचा उत्तरार्ध पहा !

**परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६.**

भगवंताचें अधिष्ठान प्राप्त करून घेऊन जो कोणी देशहितासाठीं खटपट करील त्याला यश आलेंच पाहिजे ! भगवतभक्तीवांचून देशभक्ति नाहीं ! भगवद्भक्तीवांचून देशभक्त कसा असतो, तो कोणी कोठें पाहिला नाहीं व ऐकिला नाहीं! आधीं भगवद्भक्ति, मग देशभक्ति ! किंबहुना भगवद्भक्ति, तीच देशभक्ति !

**उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ।**
**उदंड केलें तरी तो जयो । प्राप्त नाहीं ॥ १६-१०-२९.**

**समर्थांची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी ।**
**याकारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३०.**

या चरित्रापासून हा बोध महाराष्ट्राला व्हावा व तदनुसार महाराष्ट्राचें पाऊल पडावें इतकीच माझी प्रार्थना आहे.

**जे सत्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश ।**
**धर्मस्थापनेचा हव्यास । तेथेंचि वसे ॥** १७-१-२९.

असे पुरुष पूर्वी होऊन गेले आहेत व पुढें होणार आहेत, असें जें आपणांस भगवंताचें वचन आहे, तसेंच तें श्रीसमर्थांचेंही आहे. बिकट प्रसंगीं दिलें व तो प्रसंग निघून गेल्यावर निर्धास्तपणें अशक्य ठरविलें, अशांतलें हें वचन नव्हे.

**परंतु येकवचनी देव येक । जेणें सोडिले देव अनेक ।**
**सेवाहीन मी सेवक । त्याचा ह्मणवी ॥**

अशा श्रीरामदासांचें वचन आहे कीं,

**धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।**
**जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ १८-६-२०.**

तें देणें, देवा, आतां दे अशी प्रार्थना करून हा भाग संपवितां.

---

## जन्माचें सार्थक

**देह परमार्थी लाविलें । तरीच याचें सार्थक जालें ।**
**नाहीं तरी हें वेर्थचि गेलें । नाना आघातें मृत्यपंथें ॥ १-१०-६१.**

श्रीमत् दासबोधांतर्गत श्रीसमर्थचरित्र मागील प्रकरणांत दिलें आहे. या व पुढील दोन भागांत मिळून दासबोधाचें सार देण्याचा विचार आहे. पांचव्या दशकापर्यंत सामान्यपणें दासबोधाचा पूर्वार्ध आहे, असें मानण्यास हरकत नाहीं. आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याला पूर्व तयारी कशा प्रकारची पाहिजे, याचें विवेचन या पूर्वार्धांत आहे, तथापि, या पूर्वार्धांत जें विवेचन

आलें आहे, त्याचा उल्लेख उत्तरार्धांतही ठिकठिकाणीं करण्यांत आला आहे. नरजन्म ह्मणजे काय, मनुष्याचे वर्ग किती आहेत, संसाराचे कष्ट काय आहेत, नरजन्माची सफलता कशानें होईल, सद्गुरुवांचून ज्ञान नाहीं व ज्ञानावांचून मोक्ष नाहीं, तसेंच सद्गुरु कसा ओळखावा, शिष्य कसा असावा, भक्ति किती प्रकारची आहे व त्यांत श्रेष्ठ कोणती इत्यादि प्रश्नांचा उहापोह या पूर्वार्धांत आहे. संसाराचे कष्ट काय आहेत, त्यांचें विवेचन करावयास नको, कारण आपण ते कष्ट प्रत्यक्ष अनुभवीत आहोंत; परंतु आश्चर्य हें कीं, जगाचा संसार पतकरण्यासाठीं या घरांतल्या संसारांतून श्रीसमर्थ आपल्या वयाच्या १२ व्या वर्षींच दूर झाले, तरी पण त्या संसाराचें वर्णन त्यांनीं किती तरी हुबेहुब वठविलें आहे! तीच स्थिति त्रिविध तापांची. या त्रिविध तापांचें वर्णन किती तरी विस्तृतपणें केलेलें आहे. तिसऱ्या दशकाच्या पहिल्या पांच समासांत संसाराचें वर्णन आहे व ६ ते ८ या तीन समासांत त्रिविधतापांचें वर्णन आहे. दासबोध ग्रन्थ ज्यांच्या नित्य वाचनांत आहे अशांपैकीं कांहींजणांना हा भाग मोठा कंटाळवाणा वाटतो, ह्मणून कित्येक वाचक या भागावरून उडून जात असतात. पण मला वाटतें असें करणें बरोबर नाहीं. संसारांतून किंवा त्रिविध तापांतून जोंपर्यंत आपण उडून गेलों नाहीं तोंपर्यंत संसाराच्या किंवा त्रिविध तापाच्या नुसतें समासांवरून उडून जाण्यांत काय तात्पर्य आहे? असें करणें चुकीचें होईल. हे आठ समास सोपे आहेत, परंतु ते समर्थांनीं विनाकारण लिहिले आहेत असें नाहीं. संसाराचा आपणास जोंपर्यंत वीट आला नाहीं किंवा त्रिविध तापानें पोळले जाऊन परमार्थाकडे जोंपर्यंत आपण वळलों नाहीं, तोंपर्यंत तरी निदान हे समास वाचलेच पाहिजेत. समर्थ ह्मणतात,

**तैसा संसारें दुःखवला। त्रिविधतापें पोळला।**
**तोचि येक अधिकारी जाला। परमार्थासी।** ३-६-७.

संसारांत सुख नाहीं संसार करणें यांत नरदेहाची सफलता नाहीं, असें वाटावयास लागणें हीच परमार्थाची पूर्व तयारी होय.

**परम मूर्खांमाजीं मूर्ख। जो संसारीं मानी सुख॥** २-१०-४०.

असें समर्थांनीं ठरविलें आहे. अशा या कष्टमय संसारांत कोणी कोणाचें नाहीं, तरी पण आपली स्थिति

माथां प्रपंचाचें वोझें । घेऊन ह्मणे माझें माझें ।
बुडतांही न सोडी फुंजे । कुळाभिमानें ॥ ३-१०-६.

अशा प्रकारची झाली आहे. आईबाप, बहिणभाऊ, कन्यापुत्र, यांचा पाश आपणास सुटत नाहीं. परंतु समर्थ विचारतात,

कैची माता कैचा पिता । कैची बहिण कैचा भ्राता ।
कैचीं सुहृदें कैची वनिता । पुत्र कळत्रादिक ॥ ३-१०-४५.
हे तूं जाण मावेचीं । आवघीं सोइरीं सुखाचीं ।
हे तुझ्या सुखदुःखाचीं । सांगातीं नव्हेती ॥ ४६.
कैचा प्रपंच कैचें कुळ । कासया होतोसी व्याकुळ ।
धन कण लक्ष्मी सकळ । जाइजणें ॥ ४७.
कैचें घर कैचा संसार । कासया करिसी जोजार ।
जन्मवरी वाहोन भार । सेखीं सांडून जासी ॥ ४८.
कैचें तारुण्य कैचें वैभव । कैचे सोहळे हावभाव ।
हे सकळही जाण माव । माईक माया ॥ ४९.
येचक्षणीं मरोन जासी । तरी रघुनाथीं अंतरलासी ।
माझें माझें ह्मणतोसी । ह्मणोनियां ॥ ५०.
तुवां भोगिल्या पुनरावृत्ती । ऐसीं मायबापें किती ॥
स्त्री कन्या पुत्र होती । लक्षानलक्ष ॥ ५१.
कर्मयोगें सकळ मिळालीं । येके स्थळीं जन्मास आलीं ।
ते तुवां आपुलीं मानिलीं । कैसीं रे पढतमूर्खा ॥ ५२.

हा उतारा जरा मोटा झाला, पण खरोखर, तो थोडा होत आहे. तिसऱ्या दशकाच्या ९ व्या व १० व्या समासांत फार सामर्थ्य आहे. हे दोन समास सोपे आहेत तरी पण ते वारंवार वाचावेसे कां वाटतात कोण जाणे ! ते समास वाचकांनीं मुळावरून वाचावे व नंतर पुढील प्रस्तावना वाचावी. ते दोन समास वाचावे, पण ते प्रेमानें, भक्तीनें, शांताचित्तानें, व सात्विक मनोवृत्ती करून वाचावे. बद्धाच्या ठिकाणीं मुमुक्षुत्व उत्पन्न करण्याचें वर्म या दोन समासांत आहे. आपला कळवळा येऊन समर्थांनीं हे दोन समास लिहिले आहेत. ९ व्या समासांत त्यांनीं मृत्यूचें वर्णन केलें आहे.

संसार ह्मणिजे सवेंच स्वार । नाहीं मरणास उधार ।
मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ॥ ३-९-१,

**च्यारी खाणी च्यारी वाणी । चौऱ्यासी लक्ष जीवयोनी ।**
**जन्मा आले तितुके प्राणी । मृत्य पावती ॥** ३-९-३७.

मृत्यु कोणाला टळत नाहीं. दुसऱ्या एका ठिकाणीं समर्थ ह्मणतात,

**राजा असतां मृत्य आला । लक्ष कोटि कबुल जाला ।**
**तरी सोडिना तयाला । मृत्य कांहीं ॥** १२-८-३२

सारांश, मृत्यु आज नाहीं उद्यां अपरिहार्य आहे व या संसारांतील कोणतीच गोष्ट शाश्वत नाहीं. परंतु असें असूनही समर्थ ह्मणतात, मृत्यु टाळतां येईल व संसारांतील कष्टाचा मोबदलाही मिळवितां येईल.

**असो ऐसे सकळही गेले । परंतु येकचि राहिले ।**
**जे स्वरूपाकार जाले । आत्मज्ञानी ॥** ३-९-५९.

तसेंच, या संसाराचा जन्मदुःखापासून आरंभ होऊन मृत्युवेदनेंत त्याचा शेवट होतो व मधल्या अवकाशांत दुखर्णीबाहाणीं, उद्वेग, चिंता इत्यादि आहेतच. संसार हा बाजार भरला आहे असें मानलें तर ह्या इतक्या रकमा आपल्या नांवें पडतात व जमेच्या बाजूला एकच रक्कम पडण्याचा संभव आहे. ती जर न पडली तर नरदेह प्राप्त होऊन फुकट कवडीच्या फायद्यासाठीं वायां दवडला असें होणार आहे.

**हाट भरला संसाराचा । नफा पाहावा देवाचा ।**
**तरीच या कष्टाचा । परियाये होतो ॥** १२-८-३४.

नरजन्माचें सार्थक कशांत आहे हें वरील विवेचनांत ध्वनित होतच आहे. पहिल्या दशकाच्या दाहाव्या समासांत व इतरत्र कित्येक ठिकाणीं समर्थांनीं नरदेहाचें महत्व वर्णिलें आहे. आहारनिद्रादि विकार पशु व मनुष्य यांना सारखेच आहेत; मनुष्य व पशु यांच्यांत एकच फरक आहे.

**पशुदेहीं नाहीं गती । ऐसें सर्वत्र बोलती ।**
**ह्मणौन नरदेहींच प्राप्ती । परलोकाची ॥** १-१०-२१

परलोकाची प्राप्ति करून घेण्याची शक्यता इतर योनींत नसून ती फक्त नरदेहांतच आहे, हाच काय तो नरदेहाचा विशेष. नरदेहाचें महत्त्व या विशेषांतच आहे; परंतु त्याप्रमाणें नरदेहाचा इष्ट हेतु सफळ करून घेण्याचा आपण जर प्रयत्न केला नाहीं तर असा अमोलिक जन्म प्राप्त होऊनही तो फुकट दवडिल्यासारखें होणार आहे.

**येथें जेणें आळस केला। तो सर्वस्वें बुडाला।**
**देव नाहीं वोळखिला। विवेकबळें॥** २०-५-२७.

असा हा जन्म प्राप्त झाला असतां, परमार्थप्राप्ति करून घेण्याविषयीं वास्तविक आपण कितीतरी उतावीळ झालें पाहिजे; कारण तो जन्म केव्हां संपेल याचा कांहीं भरंसा नाहीं. या नरजन्मांत येऊन लांबणीवर न टाकण्यासारखी जर कोणती एखादी गोष्ट असली तर ती हीच आहे. मृत्यु केव्हां येईल याचा नियम नाहीं व शिवाय नरदेह जोंपर्यंत धडधाकड आहे, कोणतेंही व्यंग त्यांत नाहीं, तोंपर्यंतच परमार्थाचीं साधनें आपल्या हातून होण्याचा संभव आहे. परमार्थमार्ग स्वीकारण्याचें सामर्थ्य आज शरीरांत असलें तरी उद्यांला तें राहीलच असा भरंसा नाहीं. पांगळा, थोटा, अंध, बहिरा, मुका, अशक्त, रोगी, फेंपऱ्या असा देह असला तर परमार्थमार्गाला हीं सारीं विघ्नें होत. यासाठीं,

**इतुकें हें नस्तां वेंग। नरदेह आणी सकळ सांग।**
**तेणें धरावा परमार्थमार्ग। लागवेगें॥** १--१०--३२.

असें जरी आहे तरी आपलें लक्ष संसारांतून उडून परमार्थाकडे लागत नाहीं. घरदार, शेतीवाडी, यावर जडलेलें ममत्व नाहींसें होत नाहीं. समर्थ विचारतात, घर हें आपण आपलें मानीत असतों पण खरोखर तें आपलें आहे काय? आपल्याप्रमाणेंच त्या घरांत राहणारे उंदीर, पाली, माशा, कांतण्या, मुंगळे, मुंग्या, विंचू, सर्प, झुरळें, भ्रमर, मांजरें, मुंगसें, ढेंकुण इत्यादि जीव त्या घराला आपलेंच घर ह्मणून मानीत असतात. त्याप्रमाणेंच नोकरचाकर, घरांतलीं इतर माणसें, पाहुणे, मित्र, गांवकरी लोक, चोर, राजा, अग्नि इत्यादिकही त्या घरावर आपला अंमल चालवीत असतात, त्यांच्याबरोबर आपणही त्या घरावर आपला हक्क सांगतों; परंतु वास्तविक विचार केला तर ज्याला आपण आपलें घर ह्मणून ह्मणत असतों तें आपल्याखेरीज बाकीच्यांचेंच खरोखर असतें. कालांतरानें आपण नाहींसे होऊन त्या घरांत किडामुंगी इत्यादिकांचीच वस्ती कायमची होणार आहे.

**ऐसी गृहांची स्थिती। मिथ्या आली आत्मप्रचिती।**
**जन्म दों दिसांची वस्ती। कोठें तरी करावी॥** १--१०--५०.

घराची गोष्ट राहो बाजूला, पण ज्याला आपण आपलें समजतों तें

शरीर तरी आपलें आहे काय? शरीर हें आपलें ह्मणावें तर त्यांत, डोक्यामध्यें उवा होतात; फोड येऊन किडे पडतात; पोटामध्यें जंत होतात; दातांना, डोळ्यांना, कानाला कीड लागते. देहाचे चोज करकर करावें आणि एखादे दिवशीं मृत्यूनें त्याच्यावर झडप घालावी! त्या शरिराला उंदीर, मांजरें, कुत्रीं, घोडे, रीस, माकड चावतात, उंट डसतात, हत्ती चिरडतात, बैल टोंचतात, चोर मारतात, भुतें झडपतात. मग ज्या शरिरावर इतकेजण आपला अधिकार गाजवितात तें आपलें एकट्याचेंच कसें ह्मणतां येईल? वास्तविकपणें,

**ऐसें शरीर बहुतांचें । मूर्ख ह्मणे आमुचें ।**
**परंतु खाजें जिवाचें । तापत्रैं बोलिलें ॥** १--१०--६०.

ह्या सर्व वेदांताच्या गोष्टी कळत असूनही, शाश्वत सुख काय आहे तें दिसत नसल्यामुळें, क्षणभंगुर ऐहिक सुखाचा त्याग करवत नाहीं. बद्धदशा ती हीच. देहममता सुटत नाहीं. विषयसुखाचा वीट येत नाहीं. एखादा मनुष्य जन्मास येतांच त्याला झोंप लागावी व त्या स्थितींतच दोन हजार वर्षें राहून त्याला त्या झोपेंतच मरण यावें! अशासारखी बद्धाची स्थिति आहे. त्याला जागृति ह्मणून नाहींच. या जिण्यांत काय अर्थ आहे? असो. बद्ध, मुमुक्षु, साधक, सिद्ध असे मनुष्याचे चार प्रकार आहेत. ह्या चारही प्रकारांची ओळख द० ५ स० ७ ते १० यांमध्यें श्रीसमर्थांनीं करून दिलेली आहे. हे चारही समास वाचकांनीं मुळावरून वाचावे. ७ वा समास आपणांस फार आवडतो, कारण त्यांत वर्णन केलेली स्थिति आपणांस पुष्कळ ठिकाणीं पहावयास सांपडत असल्यामुळें श्रीसमर्थांनीं हें किती हुबेहुब चित्र काढलें आहे, याचें आपणास कौतुक वाटतें.

**सत्संगाची नाहीं गोडी । संतनिंदेची आवडी ।**
**देहबुद्धीची घातली बेडी । या नांव बद्ध ॥ ५--७--३८.**
**हातीं द्रव्याची जपमाळ । कांताध्यान सर्वकाळ ।**
**सत्संगाचा दुष्काळ । या नाव बद्ध ॥ ३९.**
**नेत्रीं द्रव्य दारा पाहावी । श्रवणीं द्रव्य दारा ऐकावी**
**चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी । या नाव बद्ध ॥ ४०.**
**काया वाचा आणि मन । चित्त वित्त जीव प्राण ।**
**द्रव्यदारेचें करी भजन । या नाव बद्ध ॥ ४१.**
**द्रव्य दारा तेंचि तीर्थ । द्रव्य दारा तोचि परमार्थ ॥ ४३.**

वेर्थ जाऊं नेदी काळ । संसारचिंता सर्वकाळ ।
कथा वार्ता तेचि सकळ । या नाव बद्ध ॥ ४४.
घटिका पळ निमिषभरी । दुश्चीत नव्हतां अंतरीं ।
सर्वकाळ ध्यान करी । द्रव्यदाराप्रपंचाचें ॥ ४६.
तीर्थयात्रा दान पुण्य । भक्ति कथा निरूपण ।
मंत्र पूजा जप ध्यान । सर्वही द्रव्य दारा ॥ ४७.
जागृति स्वप्न रात्रि दिवस । ऐसा लागला विषयेध्यास ।
नाहीं क्षणाचा अवकाश । या नाव बद्ध ॥ ४८.

भीत भीत उतरून घेत होतों तरी इतक्या ओंव्या उतरून घ्याव्या लागल्या. स्वतःच्या स्वरूपाची ओळख या ओंव्यांत पुष्कळांना पटेल अशी आशा आहे. द्रव्यदाराप्रपंचाच्या चिंतनांत ज्ञातारपण आलें, तरी चिंतन सुटत नाहीं, असे कितीतरी लोक आपण पाहात असतों. असो; परंतु या आपल्या वर्तनाबद्दल पश्चात्ताप उत्पन्न झाला ह्मणजे बद्धाचा मुमुक्षु झाला ह्मणून समजावें. पश्चात्तापाची दशा मोठी आनंदाची असते, ह्मणून हाही समास फार गोड वाटतो. आपले मागचे सर्व दोष आठवून पश्चात्ताप उत्पन्न होणें हें मोठें भाग्य होय. दुसऱ्याची निंदा करण्याचा धंदा सोडून स्वतःचीच निंदा करूं लागणें हें मुमुक्षुत्व ओळखण्याचें एक मोठें साधन आहे. आपले दोष जाणून त्यांचा त्याग करून मनुष्य सद्गुरूला शरण गेला आणि सद्गुरूनें त्याचा पतकर घेतला म्हणजे तो साधक झाला. याच्या पुढची पायरी ह्मणजे सिद्धाची. साधकाच्या ठिकाणीं संदेहवृत्ति असल्यास ती सिद्धपण आलें ह्मणजे पार उडून जाते.

साधकासि संदेहवृत्ती । पुढें होतसे निवृत्ती ।
याकारणें निःसंदेह श्रोतीं । साधु वोळखावा ॥ ५–१०–१२.

बद्धाला पश्चात्ताप होऊन त्याच्या ठिकाणीं मुमुक्षुत्व उत्पन्न होणें हेंच कठीण आहे. परमार्थमार्गाकडे लक्ष लागणें हीच प्रथम अवघड गोष्ट आहे, परंतु एकदां मनुष्य त्या मार्गाकडे वळला ह्मणजे मग तो, लवकर किंवा उशिरा, इष्ट स्थळीं जाऊन पोंचलाच पाहिजे. तेव्हां बद्धानें काय करावें ह्मणजे त्याचें लक्ष परमार्थाकडे वळेल, असा मुख्य प्रश्न आहे. परमार्थासंबंधानें श्रीसमर्थ ह्मणतात,

**आहे तरी परम सुगम । परी जनासी जाला दुर्गम ।**
**कां जयाचें चुकलें वर्म । सत्समागमाकडे ॥** १-९-२.

परमार्थ सुगम असूनही केवळ सत्समागम नाहीं, साधूची संगति नाहीं, सद्गुरूचा अनुग्रह नाहीं, ह्मणून आपणास तो दुर्घट वाटत आहे.

नरजन्माचें सार्थक यांतच आहे. द्रव्यसंचय करणें हा कांहीं नरजन्माचा हेतु नाहीं. ज्याच्या जवळ पुष्कळ पैसा तो श्रीमंत, तो गुणवान्, तो लौकिकवान्, तो कुलीन, तो विद्वान् असा आपला समज आहे; परंतु समर्थांची कल्पना तशी नाहीं.

**परमार्थी तो राज्यधारी। परमार्थ नाहीं तो भिकारी ॥** १-९-२३.

अशी गरीब आणि श्रीमंत यांची श्रीसमर्थांनीं व्याख्या केली आहे. अशा प्रकारचा श्रीमंत होण्याची हांव बाळगणें हेंच श्रेयस्कर होय.

**जेणें परमार्थ वोळखिला । तेणें जन्म सार्थक केला ।**
**येर तो पापी जन्मला । कुळक्षयाकारणें ॥** १-९-२५.

परमार्थावांचून जन्ममरण टळत नाहीं, हा सिद्धांत असल्यामुळें जन्ममरणाचें हाल कसें असतात व हा संसार कसा दुःखमूल आहे याची बरोबर कल्पना होऊन त्या भीतीनें तरी मनुष्याचें मन परमार्थाकडे वळावें ह्मणून द० ३ स० १ ते ५ यांत श्रीसमर्थांनीं संसाराचें चित्र काढलें आहे. तें चित्र पाहून तरी

**भल्यानें परमार्थी भरावें । शरीर सार्थक करावें ।**
**पूर्वजांस उद्धरावें । हरिभक्ती करूनी ॥** १-९-२७.

हरिभक्ति करून स्वतःचा व पूर्वजांचा उद्धार करणें यांतच नरजन्माची सफलता आहे. ती भक्ति नवविधा आहे.

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥**

या नवविधा भक्तीचें वर्णन चवथ्या दशकांत साकल्येंकरून आलें आहे.

श्रवणभक्ति या शब्दावरून आपली जी कल्पना होते तशी कल्पना श्रीसमर्थांची नाहीं. त्यांच्या श्रवणभक्तीचें रूप फार व्यापक आहे. श्रवणभक्ति ह्मणजे सर्व कांहीं ऐकून सोडावें.

**नाना पिंडांची रचना । नाना भूगोळरचना ।**
**नाना सृष्टीची रचना । कैसी ते ऐकावी ॥ ४-१-१५.**
**चंद्र सूर्य तारामंडळें । ग्रहमंडळें मेघमंडळें ।**
**येकवीस स्वर्गें सप्त पाताळें । कैसीं ते ऐकावीं ॥ १६.**
**चौदा विद्या चौसष्टी कळा । सामुद्रिक लक्षणें सकळ कळा ।**
**बत्तिस लक्षणें नाना कळा । कैशा त्या ऐकाव्या ॥ २१.**
**कोण्या दोषें कोण रोग । कोणा रोगास कोण प्रयोग ।**
**कोण्या प्रयोगास कोण योग । साधे तो ऐकावा ॥ २३.**

हीं सर्व श्रवणभक्तींतच येतात. या श्रवणभक्तींत काय वगळलें आहे ? आधुनिक जे जे शास्त्रीय शोध होत आहेत, ते ते सर्व ऐकणें आणि जाणणें ही श्रवणभक्तीच होय. श्रवणभक्तीच्या वर दिलेल्या लक्षणावरून श्रीसमर्थांचा उपदेश प्रवृत्तिपर होता, कां निवृत्तिपर होता, याची कांहींशी अटकळ बांधतां येते.

**ऐसें हें अवघेंचि ऐकावें । परंतु सार शोधून घ्यावें ।**
**असार तें जाणोनि त्यागावें । या नाव श्रवणभक्ती ॥ ४-१-२९.**

कोणतीही गोष्ट वगळावयाची नाहीं, परंतु सर्व ऐकून त्यांत सार जें असेल तेवढ्याचाच मात्र संग्रह करावा, अशी ही श्रवणभक्ति आहे.

कीर्तन ही दुसरी भक्ति होय.

**बहुत करावें पाठांतर । कंठीं धरावें ग्रन्थांतर ।**
**भगवत्कथा निरंतर । करीत जावी ॥ ४-२-३.**

द० ४×२ त या भक्तीचें जें लक्षण दिलें आहे तितकें सर्व ज्या पुरुषाच्या ठिकाणीं वसत असेल, त्याच्या कीर्तनांत श्रोते वक्ते एक होऊन किती प्रेम लोटत असेल याची कल्पना आपणांस करितां आली तर करावी.

तिसरी भक्ति नामस्मरण. नामस्मरण अखंड घडावें. आपल्या प्रापंचिक सुखदुःखामुळें नामस्मरणांत खंड पडतां कामा नये.

**चालतां बोलतां धंदा करितां । खातां जेवितां सुखी होतां ।**
**नाना उपभोग भोगितां । नाम विसरों नये ॥ ४-३-७.**

नामस्मरणाचा महिमा अगाध आहे. सर्व साधुसंतांनीं तो वर्णिला आहे. त्यासंबंधानें गैरविश्वास करण्याचा आपणास काय अधिकार आहे ?

**चहुं वर्णां नामाधिकार । नामीं नाहीं लाहान थोर ।**
**जड मूढ पैलपार । पावती नामें ॥** ४-३-२४.
**कांहींच न करूनि प्राणी । रामनाम जपे वाणी ।**
**तेणें संतुष्ट चक्रपाणी । भक्तांलागीं सांभाळी ॥** ४-३-२१.

पादसेवन ही चवथी भाक्ति होय. मूर्तीचें पादसेवन करतां येत नाहीं म्हणून सद्गुरूचेंच पादसेवन करण्यास सांगितलें आहे.

**सद्गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाव तों नाहीं ।**
**याकारणें लवलाहीं । सद्गुरुपाय सेवावे ॥** ४-४-४.

अभ्यासानें जें प्राप्त होत नाहीं, साधनें करून जें हातीं लागत नाहीं, असें जें परब्रह्मस्वरूप तें सद्गुरुकृपेनें प्राप्त होतें. म्हणून या भक्तीचें महत्त्व विशेष आहे.

पांचवी अर्चनभाक्ति होय. अर्चन म्हणजे देवतार्चन. ज्याची जी देवता असेल तिचें त्यानें पूजन करीत जावें. याशिवाय जे जे कुळधर्म असतील तेही सर्व केले पाहिजेत.

**जाखमाता मायराणी । बाळा बगुळा मानविणी ।**
**पूजा मांगिणी जोगिणी । कुळधर्में करावीं ॥** ४-५-१६.

अशा प्रकारच्या कुळधर्मांविषयीं देखील समर्थांनीं जो आदर व्यक्त केला आहे, त्यापासून आपण पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे.

**वापी कूप सरोवरें । नाना देवाळयें सिखरें ।**
**राजांगणें मनोहरें । वृंदावनें भुयरीं ॥** ४-५-२२.
**मठ मंड्या धर्मशाळा । देवद्वारीं पडशाळा ॥** ४-५-२३.
**वनें उपवनें पुष्पवाटिका । तापस्यांच्या पर्णकुटिका ॥**४-५-२६.

अशा प्रकारचीं लोकोपयोगीं कामें धर्मार्थ करणें ही अर्चनभक्तिच होय.

**शुक शारिका मयोरें । बदकें चक्रवाकें चकोरें ।**
**कोकिळाचितळें सामरें । देवाळईं समर्पावीं ॥** ४-५-२७.
**सुगंधमृगें आणि मार्जेरें । गाई म्हैसी वृषभ वानरें ।**
**नाना पदार्थ आणि लेंकुरें । देवाळईं समर्पावीं ॥** ४-५-२८.

चाफळसारख्या मनोरम ठिकाणीं समर्थांच्या वेळेला कशाप्रकारची शोभा असली पाहिजे, याची कल्पना वरील वर्णनावरून कांहींशी होते. ही अर्च-

नभक्ति जशी देवतेची तशीच ती सद्गुरूची करावी. प्रत्यक्ष पूजा न घडली तर मानसपूजा तरी अगत्य करावी.

**मनें भगवंतास पूजावें। कल्पून सर्वही समर्पावें।**
**मानसपूजेचें जाणावें । लक्षण ऐसें ॥** ४-५-३२.
**जें जें आपणास पाहिजे। तें तें कल्पून वाहिजे।**
**येणें प्रकारें कीजे। मानसपूजा ॥** ३३.

साहावी भक्ति वंदन होय. देव, संत, साधु आणि सज्जन यांना नमस्कारीत जावें.

**पशुपति श्रीपति आणी गभस्ती।**
**यांच्या दर्शनें दोष जाती।**
**तैसाचि नमावा मारुती।**
**नित्य नेमें विशेष ॥** ४-६-६.

कोणत्याही पुरुषाच्या ठिकाणीं कोणताही एखादा गुण उत्कट रीतीनें असला तर तें सद्गुरूचें अधिष्ठान आहे असें जाणून त्यास नमन करावें.

**जेथें दिसती विशेष गुण। तें सद्गुरूचें अधिष्ठान।**
**याकारणें तयासी नमन। अत्यादरें करावें ॥** ४-६-९.

नमस्कारासारखी सोपी भक्ति नाहीं. नमस्कारासाठीं कांहीं खर्च करावा लागत नाहीं. नमस्काराला कांहीं कष्ट पडत नाहींत. नमस्काराला फक्त एकाच गोष्टीची अपेक्षा असते.

**साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली।**
**सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें ॥** ४-६-२४.

सातवें भजन तें दास्य जाणावें. देवद्वारीं सदा सर्वकाळ राहून लहान मोठें जें कार्य पडेल तें करित जावें. जीर्ण देवालयांचा उद्धार करणें, धर्मशाळा बांधणें, पशु पक्ष्यादिकांच्या साठीं शाळा बांधणें, वगैरे कामें या दास्यभक्तींत येतात. देवासाठीं हरएक काम करण्यास नेहमीं तत्पर असलें पाहिजे. ही भक्ति प्रत्यक्ष न घडली तर मानसपूजेनें करावी. जसें देवाचें तसेंच सद्गुरूचें दास्य करावें.

आठवी भक्ति ह्मणजे सख्य.

**देवास जयाची प्रीती। आपण वर्तावें तेणें रीतीं ॥** ४-८-३.

असें सख्यभक्तीचें धोरण आहे. जें देवास आवडतें तेंच आपणांस आवडावें.

देवाच्या मनासारखें आपलें वर्तन राहिलें ह्मणजे सहजच देवाशीं सख्य घडतें. नवविधा भक्ति बोलण्यास सोपी आहे, परंतु तीपैकीं कोणताही प्रकार हातून घडणें महा दुर्घट आहे. देवाच्या मनासारखें वागावें हें ह्मणणें कठीण नाहीं, परंतु तसें वर्तन कोणाचें घडत असतें?

**देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी ।**
**सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तोहि वेचावा ॥** ४-८-८.

देवाच्या सख्यत्वापुढें प्राणाची किंमत नाहीं असें वाटेल तरच ती खरी सख्य भक्ति.

**देव ह्मणिजे आपुला प्राण ॥** ४-८-१०.

तात्पर्य, आपण आपल्या प्राणाला जितकें जपतों तितकें, किंबहुना त्याहून जास्त, देवास जपलें पाहिजे. "काय देव करील तें खरें" असें आपण बोलत असतों, परंतु खरोखर देवावर इतकी निष्ठा ठेवून आपण केव्हांही चालत नाहीं.

**ह्मणोनि ऐसें न करावें । सख्य तरी खरेंचि करावें ।**
**अंतरीं सदृढ धरावें । परमेश्वरासी ॥** ४-८-२०.

असा अनन्य भाव ठेवून देवाची भक्ति केली ह्मणजे देवाला भक्ताची काळजी लागते. जसा देव तसाच गुरु असा शास्त्रविचार आहे ह्मणून देवाप्रमाणेंच सद्गुरूच्या ठिकाणींही अनन्यभाव असावा.

नवविधा भक्तींतील शेवटची भक्ति ह्मणजे आत्मनिवेदन होय. ही भक्ति सर्वांत श्रेष्ठ आहे.

**पंचभूतांमध्यें आकाश । सकळ देवांमध्यें जगदीश ।**
**नवविधा भक्तिमध्यें विशेष । भक्ति नवमी ॥** ४-९-२४.

ही भक्ति सर्वांत श्रेष्ठ आहे याचें कारण असें कीं, जोंपर्यंत ही भक्ति घडली नाहीं तोंपर्यंत जन्ममरण चुकत नाहीं.

**नवमी भक्ती आत्मनिवेदन । न होतां न चुके जन्ममरण ।**
**हें वचन सत्य प्रमाण । अन्यथा नव्हे ॥** ४-९-२५.

अशी ही भक्ति आपल्या हातून घडणें शक्य आहे किंवा नाहीं हा प्रश्न निराळा आहे, तथापि तिचें लक्षण जाणणें अगत्याचें आहे.

आत्मनिवेदन तीन प्रकारचें आहे, किंवा आत्मनिवेदनाच्या तीन पायऱ्या आहेत असें ह्मणणें जास्त सयुक्तिक होईल. (१) जड आत्मनिवेदन, (२) चंचळ आत्मनिवेदन, (३) निश्चळ आत्मनिवेदन.

**पदार्थ मनें काया वाचा । मी हा अवघाचि देवाचा ।**
**जड आत्मनिवेदनाचा । विचार ऐसा ॥ १२-५-१६.**
**चंचळकर्ता तो जगदीश । प्राणीमात्र त्याचा अंश ।**
**त्याचा तोचि आपणास । ठाव नाहीं ॥ १२-५-१७.**
**ठावचि नाहीं चंचळाचा । तेथें आधीं आपण कैंचा ।**
**निश्चळ आत्मनिवेदनाचा । विवेक ऐसा ॥ १२-५-२०.**

हें शेवटचें निश्चळ आत्मनिवेदन घडलें पाहिजे. मी कोण आणि देव कोण याचा शोध घेऊन मी आणि देव अनन्य आहोंत असें ज्ञान होणें याचें नांव आत्मनिवेदन.

**आत्मनिवेदनाचें लक्षण । आधीं पाहावें मी कोण ।**
**मग परमात्मा निर्गुण तो वोळखावा ॥ ८-८-१३.**

मी कोण? माझें शरीर कांहीं मी नव्हे. माझें शरीर पंचभूतात्मक आहे. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश यांचें तें बनलेलें आहे. हें प्रत्येक तत्व तत्वांत मिळविलें तर अवशिष्ट काय उरलें? तें मी.

**तत्वांचें गांठोडें शरीर । याचा पाहातां विचार ।**
**येक आत्मा निरंतर । आपण नाहीं ॥ ६-२-३३.**

निर्गुण परब्रह्माव्यतिरिक्त मी दुसरा कोणी नाहीं. निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणीं पापपुण्य, यमयातना, जन्ममरण हीं कांहींच नाहींत, आणि मी जर तद्रूप आहें तर मला तरी जन्ममरणाची भीति कोठें उरली? कोठें उरली असा प्रश्न विचारून मात्र माझी भीति गेली असें होत नाहीं; याचें कारण काय? याचें कारण,

**तत्वीं वेटाळून घेतला । प्राणी संशयें गुंडाळला ।**
**आपणासी आपण भुलला । कोहं ह्मणे ॥ ६-३-३४.**

माझा देह ह्मणजे तत्वांचा नुसता विस्तार आहे हें कळत नाहीं ह्मणून मी कोण याचें ज्ञान होत नाहीं. उलट पक्षीं देह तोच मी असें वाटत असतें, ह्मणून जन्ममरणाची भीति जात नाहीं.

**तत्वीं गुंतला ह्मणे कोहं । विवेक पाहातां ह्मणे सोहं ।**
**अनन्य होतां अहं सोहं । मावळलीं ॥** ६-३-३५.

याचें नांव आत्मनिवेदन. मी कोण हा प्रश्न आणि त्याचें उत्तर देव तोच मी, असें प्रश्नोत्तरही जेव्हां उरत नाहीं, जेव्हां निर्गुणाशीं तादात्म्य होऊनें ज्ञानाचें विज्ञान होतें, तेव्हां आत्मनिवेदन भक्ति घडली असें समजावयाचें. तिचेंच नांव सायुज्यमुक्ति.

**आत्मनिवेदनाचे अंतीं । जे कां घडली अभेद भक्ति ।**
**तये नांव सायोज्यमुक्ति । सत्य जाणावी ॥** ८-८-१९.

किंवा

**निर्गुणीं जे अनन्यता । तेचि मुक्ति सायोज्यता ॥** ११-१-४२.

जन्माचें सार्थक यांतच आहे. निर्गुण आत्मा आणि आपण एक आहोंत असें ज्ञान होणें हीच नरजन्मसफलता होय.

**जालें जन्माचें सार्थक । निर्गुण आत्मा आपण येक ।**
**परंतु हा विवेक । पाहिलाच पाहावा ॥** ६-२-३७.
**आपणास निवेदावें । आपण विवेकें नुरावें ।**
**आत्मनिवेदन जाणावें । याचें नाव ॥** ६-२-३९.

आतां जन्ममरणाची भीति कोठें उरली ? प्रारब्धानुसार देह पडावयाचा असेल तेव्हां पडेल; पण हें श्रीसमर्थांच्या शब्दांनींच येथें देणें बरें.

**आत्मनिवेदनाउपरी । निखळ वस्तु निरंतरी ।**
**आपण आत्मा अंतरीं । बोध जाला ॥** ६-२-४१.
**त्या ब्रह्मबोधें ब्रह्मचि जाला । संसारखेद तो उडाला ।**
**देहो प्रारब्धीं टाकिला । सावकास ॥** ४२.
**यासी ह्मणिजे आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान ।**
**परब्रह्मीं अभिन्न । भक्तचि जाला ॥** ४३.
**आतां होणार तें होयेना कां । आणि जाणार तें जायेना कां ।**
**तुटली मनांतील अशंका । जन्ममृत्याची ॥** ४४.
**संसारीं पुंडावें चुकलें । देवां भक्तां ऐक्य जालें ।**
**मुख्य देवास वोळखिलें । सत्संगेंकरूनी ॥** ४५.

अशी ही आत्मनिवेदन भक्ति आहे. ती घडणें हाच नरजन्माचाच हेतु आहे. ती घडली तरच नरजन्माचें सार्थक झालें, असें होणार आहे.

**बहुतां जन्मांचे अंतीं । होये नरदेहाची प्राप्ती ।**
**येथें न होतां ज्ञानें सद्गती । गर्भवास चुकेना ॥** ८-७-१८.
**नरदेह परम दुर्लभ । येणें घडे अलभ्य लाभ ।**
**दुर्लभ तें सुलभ । होत आहे ॥** २०-५-२५.
**वरकड देहे हे काबाड । नरदेह मोठें घबाड ।**
**परंतु पाहिजे जाड विवेकरचना ॥** २०-५-२६.

आत्मनिवेदनभक्ति ह्मणजे निर्गुणाचें ज्ञान होय. आत्मनिवेदनभक्तीचें लक्षण वाचून सगुणोपासना करावी कीं न करावी अशी शंका मनांत उत्पन्न होते. कल्पनासृष्टि, शाब्दिकसृष्टि, प्रत्यक्षसृष्टि, चित्रलेपसृष्टि, स्वप्नसृष्टि, गंधर्वसृष्टि, ज्वरसृष्टि, आणि दृष्टिबंधनसृष्टि अशी अष्टविधा सृष्टि आहे आणि ती मिथ्या आहे. तर मग सगुणोपासना ह्मणजे मिथ्या सृष्टीचीच उपासना नव्हे काय ? देव हरवला, चोरीस गेला, दुष्टांनीं फोडला, भ्रष्ट केला, उदकांत टाकला किंवा पायातळीं घातला इत्यादि बोलण्याचे प्रकार समंजसपणाचे आहेत काय ? सोनारानें किंवा पाथरवटानें देव घडला याचा अर्थ काय ? अशी मनामध्यें शंका येते आणि समर्थ त्याच शंकेला पुष्टि देतात,

**देवें निर्मिली हे क्षिती । तिचे पोटीं पाषाण होती ।**
**तयासचि देव ह्मणती । विवेकहीन ॥** ८-१-२९.
**धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा ।**
**तेथें देव कैचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥** ६-६-४४.

तात्पर्य समर्थ ह्मणतातः—

**अंतरनिष्ठ तितुके तरले । अंतरभ्रष्ट तितुके बुडाले ।**
**बाह्याकारें भरंगळले । लोकाचारें ॥** १८-१-२४.

तर मग उद्यांपासून सगुणाची उपासना करावयास नको ? नाहीं, सगुणाची उपासना केलीच पाहिजे. ती कां ? सद्गुरु सांगतात ह्मणून, कारण

**गुरुचें वचनप्रतिपाळण । हें मुख्य परमार्थाचें लक्षण ।**
**वचनभंग करितां विलक्षण । सहजेंचि जालें ॥** ६-७-१०.

यावर शिष्य अति नम्रपणें विचारितो कीं, मिथ्या सगुणाची उपासना करण्याविषयीं सद्गुरूनें तरी असा आग्रह कां धरावा? यावर सद्गुरु शिष्याला ह्मणतात कीं, बाबारे तूं एकव्यानें भजन केलें नाहींस ह्मणून कांहीं अद्भुन

राहत नाहीं, पण इतर सर्व व्यवहार जर तूं सोडले नाहींस तर मग भजनानें-च तुझें असें काय घोडें मारलें आहे? इतर व्यवहारही मिथ्याच आहेत; ते मात्र तुला सोडवत नाहींत. सृष्टि सर्व मिथ्या आहे असें ह्मणून, खाण्यापिण्याचें तूं थोडेंच वर्ज केलें आहेस ?

**साहेबास लोटांगणीं जावें । नीचासारिखें व्हावें ।**
**आणि देवास न मनावें । हें कोण ज्ञान ॥** ६-७-१९.

शिवाय, हें सर्व मिथ्या आहे असें समजून जर तूं हा प्रश्न विचारतास तर हरकत नव्हती, पण तूं केवळ वादासाठीं हा प्रश्न विचारीत आहेस. सृष्टि मिथ्या आहे असें समजून तूं ह्मणत असशील तर नको करूंस सगुणाची उपासना; पण तुला हें ज्ञान कोठें झालें आहे? सगुणाची उपासना करूनच सृष्टीचें मिथ्यात्व कळतें.

**सकळ मिथ्या होऊन जातें । हें रामभजनें कळों येतें ॥**६-७-४३.
**सगुणीं भजावें निश्चित । निश्चयालागीं ॥** ६-६-५४.
**सगुणाचेनि अधारें । निर्गुण पाविजे निर्धारें ॥** ५५.

यासाठीं आधीं सगुणोपासना कर, तुला ज्ञान होऊं दे, आणि मग पाहिजे तर नको करूंस सगुणोपासना. नाहींपेक्षां

**निर्गुण नेलें संदेहानें । सगुण नेलें ब्रह्मज्ञानें ।**
**दोहिकडे अभिमानें । वोस केलें ॥** १४-५-९.

असें व्हावयाचें. वास्तविक असें आहे कीं सिद्ध जरी झाला तरी देखील त्यानें सगुणोपासना सोडूं नये.

**ज्ञानबळें उपासना । आह्मी भक्त जरी मानूं ना ।**
**तरी या दोषाच्या पतना । पावों अभक्तपणें ॥** ६-७-४०.

अशी नवविधा भक्ति आहे. ती निष्कामपणें घडली पाहिजे. सकाम भजनानें फार तर मनांतील कामना पूर्ण होतील, परंतु निष्काम भजनानें भगवंताची प्राप्ति होते; आणि एकदां भगवंत जोडल्यावर हातास येणार नाहीं असें कोणतें फळ शिल्लक उरणार आहे ?

**नाना फळें देवापासीं । आणी फळ अंतरी भगवंतासी ।**
**याकारणें परमेश्वरासी । निःकाम भजावें ॥** १०-७-२१.

असो. आत्मानिवेदनभक्तीचें वर जें लक्षण करण्यांत आलें आहे त्यावरून

**बहुतां जन्मांचे अंतीं । होये नरदेहाची प्राप्ती ।**
**येथें न होतां ज्ञानें सद्गती । गर्भवास चुकेना ॥** ८-७-१८.
**नरदेह परम दुल्लभ । येणें घडे अलभ्य लाभ ।**
**दुल्लभ तें सुल्लभ । होत आहे ॥** २०-५-२५.
**वरकड देहे हे काबाड । नरदेह मोठें घबाड ।**
**परंतु पाहिजे जाड विवेकरचना ॥** २०-५-२६.

आत्मनिवेदनभक्ति ह्मणजे निर्गुणाचें ज्ञान होय. आत्मनिवेदनभक्तीचें लक्षण वाचून सगुणोपासना करावी कीं न करावी अशी शंका मनांत उत्पन्न होते. कल्पनासृष्टि, शाब्दिकसृष्टि, प्रत्यक्षसृष्टि, चित्रलेपसृष्टि, स्वप्नसृष्टि, गंधर्वसृष्टि, ज्वरसृष्टि, आणि दृष्टिबंधनसृष्टि अशी अष्टविधा सृष्टि आहे आणि ती मिथ्या आहे. तर मग सगुणोपासना ह्मणजे मिथ्या सृष्टीचीच उपासना नव्हे काय ? देव हरवला, चोरीस गेला, दुष्टांनीं फोडला, भ्रष्ट केला, उदकांत टाकला किंवा पायातळीं घातला इत्यादि बोलण्याचे प्रकार समंजसपणाचे आहेत काय ? सोनारानें किंवा पाथरवटानें देव घडला याचा अर्थ काय ? अशी मनामध्यें शंका येते आणि समर्थ त्याच शंकेला पुष्टि देतात,

**देवें निर्मिली हे क्षिती । तिचे पोटीं पाषाण होती ।**
**तयासचि देव ह्मणती । विवेकहीन ॥** ८-१-२९.
**धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा ।**
**तेथें देव कैचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥** ६-६-४४.

तात्पर्य समर्थ ह्मणतातः—

**अंतरनिष्ठ तितुके तरले । अंतरभ्रष्ट तितुके बुडाले ।**
**बाह्याकारें भरंगळले । लोकाचारें ॥** १८-१-२४.

तर मग उद्यांपासून सगुणाची उपासना करावयास नको ? नाहीं, सगुणाची उपासना केलीच पाहिजे. ती कां ? सद्गुरु सांगतात ह्मणून, कारण

**गुरुचें वचनप्रतिपाळण । हें मुख्य परमार्थाचें लक्षण ।**
**वचनभंग करितां विलक्षण । सहजेंचि जालें ॥** ६-७-१०.

यावर शिष्य अति नम्रपणें विचारितो कीं, मिथ्या सगुणाची उपासना करण्याविषयीं सद्गुरूनें तरी असा आग्रह कां धरावा ? यावर सद्गुरु शिष्याला ह्मणतात कीं, बाबारे तूं एकदाच्यानें भजन केलें नाहींस ह्मणून कांहीं अडून

राहत नाहीं, पण इतर सर्व व्यवहार जर तूं सोडले नाहींस तर मग भजनानें-च तुझें असें काय घोडें मारलें आहे? इतर व्यवहारही मिथ्याच आहेत; ते मात्र तुला सोडवत नाहींत. सृष्टि सर्व मिथ्या आहे असें ह्मणून, खाण्यापिण्याचें तूं थोडेंच वर्ज केलें आहेस ?

**साहेबास लोटांगणीं जावें। नीचासारिखें व्हावें।**
**आणि देवास न मनावें। हें कोण ज्ञान॥** ६-७-१९.

शिवाय, हें सर्व मिथ्या आहे असें समजून जर तूं हा प्रश्न विचारतास तर हरकत नव्हती, पण तूं केवळ वादासाठीं हा प्रश्न विचारीत आहेस. सृष्टि मिथ्या आहे असें समजून तूं ह्मणत असशील तर नको करूंस सगुणाची उपासना; पण तुला हें ज्ञान कोठें झालें आहे? सगुणाची उपासना करूनच सृष्टीचें मिथ्यात्व कळतें.

**सकळ मिथ्या होऊन जातें। हें रामभजनें कळों येतें॥**६-७-४३.
**सगुणीं भजावें निश्चित। निश्चयालागीं॥** ६-६-५४.
**सगुणाचेनि अधारें। निर्गुण पाविजे निर्धारें॥** ५५.

यासाठीं आधीं सगुणोपासना कर, तुला ज्ञान होऊं दे, आणि मग पाहिजे तर नको करूंस सगुणोपासना. नाहींपेक्षां

**निर्गुण नेलें संदेहानें। सगुण नेलें ब्रह्मज्ञानें।**
**दोहिकडे अभिमानें। वोस केलें॥** १४-५-९.

असें व्हावयाचें. वास्तविक असें आहे कीं सिद्ध जरी झाला तरी देखील त्यानें सगुणोपासना सोडूं नये.

**ज्ञानबळें उपासना। आह्मी भक्त जरी मानूं ना।**
**तरी या दोषाच्या पतना। पावों अभक्तपणें॥** ६-७-४०.

अशी नवविधा भक्ति आहे. ती निष्कामपणें घडली पाहिजे. सकाम भजनानें फार तर मनांतील कामना पूर्ण होतील, परंतु निष्काम भजनानें भगवंताची प्राप्ति होते; आणि एकदां भगवंत जोडल्यावर हातास येणार नाहीं असें कोणतें फळ शिल्लक उरणार आहे ?

**नाना फळें देवापासीं। आणी फळ अंतरी भगवंतासी।**
**याकारणें परमेश्वरासी। निःकाम भजावें॥** १०-७-२१.

असो. आत्मानिवेदनभक्तीचें वर जें लक्षण करण्यांत आलें आहे त्यावरून

आत्मनिवेदनापासून आत्मज्ञान कांहीं निराळें नाहीं, ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आलीच असेल. या आत्मज्ञानाचें निरूपण दशक ५ पासून तों दशक २० पर्यंत श्रीसमर्थांनीं केलें आहे. त्याचा गोषवारा पुढील भागांत यथामति देण्याचा विचार आहे. परंतु तत्पूर्वी श्रीमत् दासबोधांत ठिकठिकाणीं प्रतिपादित केलेल्या दोन सिद्धान्तांचा या ठिकाणीं उल्लेख करून ठेवणें अगत्याचें आहे. त्यांपैकीं पहिला सिद्धांत ह्मणजे हा कीं,

**ज्ञानावांचून मोक्ष नाहीं.**

मुक्ति चत्वार आहेत. सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता. त्यांच्या व्याख्या श्रीसमर्थांनीं केल्या आहेत,

**लोकीं राहावें ते सलोकता। समीप असावें ते समीपता।**
**स्वरूपचि व्हावें ते स्वरूपता। तिसरी मुक्ती॥** ४-१०-२४.

ह्या तिन्ही नाशवंत आहेत, चवथी मुक्ति मात्र शाश्वत आहे.

**निर्गुणीं अनन्य असतां। तेणें होय सयोज्यता।**
**सायोज्यता ह्मणिजे स्वरूपता। निर्गुण भक्ती॥** ४-१०-३०.

ही शाश्वत मुक्ति ज्ञानावांचून मिळत नाहीं. श्रीमत् दासबोध हा ज्ञानप्रधान ग्रन्थ आहे. त्यांत मुख्यतः ज्ञानाचें महत्व वर्णिलें आहे. ज्ञान ह्मणजे काय व तें कसें प्राप्त करून घ्यावें हांच दासबोधांतील मुख्य विषय आहे. नवविधा भक्ति इत्यादि ही पूर्व तयारी होय. ज्ञानावांचून मोक्ष नाहीं हा सिद्धान्त श्रीसमर्थांनीं ठिकठिकाणीं दिला आहे. मोक्ष ह्मणजे काय ?

**जन्ममृत्यापासून सुटला। या नांव जाणिजे मोक्ष जाला॥**

मी जीव आहे; मला बंधन आहे, जन्ममरण आहे, असा संकल्प करूनच प्राणी बद्ध झालेला असतो. त्या संकल्पापासून मुक्त होणें याचें नांव मोक्ष. संकल्पापासून मुक्त होणें ह्मणजेच ज्ञानसंपन्न होणें होय. हें ज्ञान जोंपर्यंत झालें नाहीं तोंपर्यंत जन्ममरणाचे फेरे चुकत नाहींत.

**नरदेहीं ज्ञानेंविण। कदां न चुके जन्ममरण।**
**भोगणें लागती दारुण। नाना नीच योनी॥** ८-७-२५.
**प्रेलेंवीण कार्य जालें। जेविल्यावीण पोट भरलें।**
**ज्ञानेंवीण मुक्त जाले। हें तों घडेना॥** ९-७-३३.
**जव नाहीं ज्ञानप्राप्ती। तव चुकेना यातायाती॥** ५-१-३५.

**ज्ञानरहित तळमळ । जाणार नाहीं ॥** ५-५-१.

**तें परब्रह्म जों कळेना । तों जन्ममृत्य चुकेना ॥** १५-४-२४.

सारांश, ज्ञान जर झालें नाहीं तर इतर साधनें कितीही केलीं तरी मोक्ष प्राप्त व्हावयाचा नाहीं.

**न जाणतां कोटीवरी । साधनें केलीं परोपरीं ।**
**तरी मोक्षास अधिकारी । होणार नाहीं ॥** ९-४-२८.

हें अगदीं निश्चित आहे असें श्रीसमर्थांनीं ठरविलेलें आहे. समर्थांचा सांप्रदाय ह्मणजे काय हें सांप्रदायाच्या बाहेर राहून समजणें दुर्घट आहे. बाहेर राहून सांप्रदायाविषयीं कांहीं कांहीं कल्पना होतील, परंतु यथार्थ व संपूर्ण ज्ञान होणार नाहीं. श्रीसमर्थांची उपासना ह्मणजे तरी काय, याचा जर खोल विचार केला व उपासनेसंबंधानें त्यांनीं ठिकठिकाणीं जे उद्गार काढले आहेत ते जर पाहिले, तर असें दिसून येणार आहे कीं, श्रीसमर्थांची उपासना ह्मणजे ज्ञानच होय. द० १५×९, २०×८, व २०×९ हे समास वाचले ह्मणजे माझ्या ह्मणण्याची वाचकांस साक्ष पटेल. समर्थांच्या उपासनेप्रमाणें ब्रह्मांडाच्या उभारणीचें ज्ञान तें आवाहन व संव्हारणीचें ज्ञान तें विसर्जन होय. ही नुसती मी कल्पना करितों असें नव्हे. एक दोन ठिकाणीं उपासना ह्मणजे ज्ञानच असें त्यांनीं सांगितलेलें आहे.

**उपासना ज्ञानस्वरूप ॥** २०-४-२०.

तसेंच

**उपासना ह्मणिजे ज्ञान । ज्ञानें पाविजे निरंजन ।**
**योगियांचें समाधान । येणें रितीं ॥** २०-४-२२.

सारांश, भक्ति नवविधा असली तरी त्यांत श्रेष्ठ भक्ति जी आत्मनिवेदन ह्मणजे आत्मज्ञान, ती झाल्याशिवाय मुक्ति नाहीं. ज्ञानावांचून सद्गति नाहीं ही गोष्ट समर्थांनीं एका ठिकाणीं इतकी निक्षून सांगितली आहे कीं, त्या ओंव्या वाचकांनीं अवश्य वाचल्या पाहिजेत ह्मणून येथें देतों.

**परमेश्वरास वोळखिलें । आपण कोणसें कळलें ।**
**आत्मनिवेदन जालें । ह्मणिजे बरें ॥** १०-८-२२.
**ब्रह्मांड कोणें केलें । कासयाचें उभारिलें ।**
**मुख्य कर्त्यास वोळखिलें । ह्मणिजे बरें ॥** २३.

**येथें अनुमान राहिला । तरी परमार्थ केला तो वाया गेला ।**
**प्राणी संशई बुडाला । प्रचितीविण ॥ २४.**
**हें परमार्थाचें वर्म । लटिकें बोलेल तो अत्धम ।**
**लटिकें मानील तो अधमोत्धम । येथार्थ जाणावा ॥ २५.**
**येथें बोलण्याची जाली सीमा । नेणतां नकळे परमात्मा ।**
**असत्य नाहीं सर्वोत्तमा । तूं जाणसी ॥ २६.**
**माझे उपासनेचा बडिवार । ज्ञान सांगावें साचार ।**
**मिथ्या बोलतां उत्तर । प्रभूस लागे ॥ २७.**

श्रीसद्गुरु समर्थांनीं प्रस्थापित केलेला दुसरा सिद्धान्त ह्मणजे

**सद्गुरूवांचून ज्ञान नाहीं**

हा होय. परमार्थाचीं भांडारगृहें उघडण्यास सद्गुरुकृपा हीच एक किल्ली आहे. ती किल्ली जोंपर्यंत हातास आली नाहीं तोंपर्यंत परमार्थ हा परम सुगम असूनही आपणास तो दुर्गमच वाटणार आहे; परंतु ती किल्ली एकदां हस्तगत झाली ह्मणजे परमार्थाचा गड बाहेरून कितीही अभेद्य व आजिंक्य वाटला तरी तो सर करणें मुळींच अवघड नाहीं. एकदां शिष्यांनीं श्रीसमर्थांना प्रश्न केला कीं, महाराज, सद्गुरूनें अंगीकार केल्यापासून किती दिवसांनीं मोक्ष प्राप्त होतो ? त्यावर सद्गुरु ह्मणतातः—

**जेचि क्षणीं अनुग्रह केला । तेचि क्षणीं मोक्ष जाला ॥ ८-७-५९.**

परिसाच्या संगतीनें लोखंडाचें सोनें जितक्या वेळांत होतें, तितकाच वेळ श्रीसद्गुरूनें अंगिकार केल्यापासून मोक्षप्राप्ति होण्यास लागतो. परंतु असें होण्यास गुरु सद्गुरु व शिष्य सच्छिष्य असावयास पाहिजे. द ५×२ त सद्गुरु व असद्गुरु यांचीं लक्षणें दिलीं आहेत.

**ह्मणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्मकर्म आणि साधन ।**
**कथा निरूपण श्रवण मनन । नीति न्याये मर्यादा ॥ ५-२-५२.**

इतक्या गुणांनीं युक्त सद्गुरु असला पाहिजे, यांत एकही गुण कमी असतां कामा नये. व

**मुख्य सच्छिष्याचें लक्षण । सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण ॥ ५-३-१९.**

अशा तऱ्हेचा शिष्य पाहिजे. ५×२ वरून सद्गुरु कसा पाहिजे याची कल्पना करून आपण स्वतः सच्छिष्य आहोंत किंवा नाहीं हें ५×३ वरून ठरवावें.

शिष्य जर सावध, साक्षेपी, दक्ष, प्रज्ञावंत आणि अनन्य असेल तर त्याला ज्ञान होण्यास एका क्षणाचाही अवकाश नको.

**सावध साक्षपी विशेष । प्रज्ञावंत आणी विश्वास ।**
**तयास साधनीं सायास । करणेंचि नलगे ॥** ८–६–४९.

सद्गुरुकृपेंत इतकें सामर्थ्य आहे.

**सद्गुरुविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं ।**
**अज्ञान प्राणी प्रवाहीं । वाहातांचि गेले ॥** ५-१-२१.
**सद्गुरुविण जन्म निर्फळ । सद्गुरुविण दुःख सकळ ।**
**सद्गुरुविण तळमळ । जाणार नाहीं ॥** ५–१–३९.
**असो जयासी मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।**
**सद्गुरुविण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥** ५–१–४४.

अशा प्रकारचें समर्थांचें निक्षून सांगणें आहे. ज्ञानप्राप्ति होण्यास सद्गुरुकृपेवांचून दुसरा मार्ग नाहीं. परमार्थाच्या मुक्कामास जाण्यास एकच वाट आहे. सद्गुरुभजन ही त्या वाटेवरची पहिली चौकी आहे; ती टाळून पुढें जातांच येत नाहीं.

**परमार्थाचें जन्मस्थान । तेंचि सद्गुरूचें भजन ॥** ७-१०-३८.

आणि ह्मणून

**देह मिथ्या जाणोनि जीवें । याचें सार्थकचि करावें ।**
**भजनभावें तोषवावें । चित्त सद्गुरूचें ॥** ७-१०-३९.

यांतच देहाचें सार्थक आहे. महाराष्ट्रधर्माची दीक्षा देणारे जे सद्गुरु त्यांच्या भजनीं महाराष्ट्रानें लागावें यांतच महाराष्ट्राचा तरणोपाय आहे.

---

## आत्मज्ञान.

**ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान ह्मणिजे आत्मज्ञान ।**
**पाहावें आपणासि आपण । या नाव ज्ञान ॥** ५-६-१.

श्रीमत् दासबोधाच्या पांचव्या दशकापासून तों अखेरपर्यंत ' बहुधा अध्यात्मनिरोपण' निरूपिलेलें आहे. पांचव्या दशकाच्या साहाव्या समासांत

आत्मज्ञानाचें लक्षण देऊन त्याचें स्पष्टीकरण आठ दशक अखेरपर्यंत करण्यांत आलें आहे. आठ दशकांच्या पुढें याच विषयाची बहुतकरून पुनरुक्ति आहे. दासबोधाचा हा भाग अत्यंत कठीण आहे. तो अनेकदां वाचूनही समजत नाहीं, तरी पण तो वाचण्याचा कंटाळा केव्हांच येत नाहीं, याचें कारण असें आहे कीं, श्रीसमर्थांनीं हा गहन विषय समजावून सांगतांना व्यवहारांतीलच दृष्टान्त दिलेले आहेत. कोठें कोठें तर सबंध समासांत व्यावहारिक उपदेश असून शेवटच्याच ओवींत अध्यात्माचें सार ओतलेलें असतें. अशीं अधिकरणवचनें फार गोड लागतात. समासाच्या आरंभापासून सामान्य उपदेश असून शेवटचीच ओवी अध्यात्मपर असली ह्मणजे ती न समजूनही गोड लागते, वारंवार पुटपुटली जाते व तेणेंकरून पाठ होते. तात्पर्य, दासबोधांतील ह्या अध्यात्मपर भागाचा सारांश देण्यास मी सर्वस्वीं अनधिकारी आहे. परंतु एकंदर ग्रन्थाचें स्वरूप प्रस्तावनेंत दर्शविण्याचा हेतु मनांत योजल्यामुळें ह्याही भागाबद्दल दोन शब्द यथामति लिहिण्याचा प्रयत्न केल्याशिवाय गत्यन्तरच नाहीं.

श्रीरामदासाभिमानी वाचकांस माझी अशी विनंती आहे कीं, त्यांनीं दासबोधांतील ह्या भागाकडे पूर्ण लक्ष द्यावें. श्रीमत् दासबोध ग्रन्थ लिहिण्यांत श्रीसमर्थांचा मुख्य हेतु अध्यात्मनिरूपण करण्याचाच होता. अर्थात् श्रीसमर्थांनीं केलेल्या इतर व्यावहारिक उपदेशाकडे सर्वस्वीं लक्ष देऊन ह्या भागाची जर आपल्याकडून उपेक्षा घडली तर तें बरोबर होणार नाहीं. आत्मज्ञान कठीण असेल, तरी पण त्याच मानानें त्याचें महत्त्वही विशेष आहे.

**अष्टांग योग पिंडज्ञान । त्याहून थोर तत्वज्ञान ।**
**त्याहून थोर आत्मज्ञान । तें पाहिलें पाहिजे ॥** १७-३-२४.

परमार्थाचीं इतर जीं साधनें आहेत त्या सर्वांत श्रेष्ठ आत्मज्ञान आहे.

**नाना व्रतें नाना दानें । नाना योग तीर्थाटणें ।**
**सर्वांहून कोटिगुणें । महिमा आत्मज्ञानाचा ॥** १०-१०-६४.

अशा प्रकारच्या आत्मज्ञानाची उपेक्षा करणें ह्मणजे नरदेह फुकट दवडण्यासारखें आहे. हें ज्ञान सहज होण्यासारखें नाहीं हें उघड आहे; किंबहुना परमेश्वराची कृपा झाल्याशिवाय तें प्राप्तही होणें नाहीं. कांहीं क्षुल्लक कारभार करावयाचा असला तरी देखील आपणांस किती सावधगिरी घ्यावी लागते,

मग आत्मज्ञानासारखी असाध्य भासणारी वस्तु मिळविण्यास आपण किती खटपट केली पाहिजे, हें काय सांगावें ?

**येकांतीं नाजुक कारबार । तेथें असावें अति तत्पर ।**
**त्याच्या कोटिगुणें विचार ॥ अध्यात्मग्रन्थीं ॥** १७-३-७.

अशी वस्तु सहजासहजी, अल्प प्रयासानें कशी प्राप्त व्हावी ? सारांश, हें ज्ञान प्राप्त करून घेण्याविषयीं केलेला प्रयत्न कधींच वायां जावयाचा नाहीं हें जरी खरें आहे, तरी त्यास भगीरथ प्रयत्नाची अपेक्षा आहे, हें विसरतां कामा नये.

अशा ह्या गहन आत्मज्ञानाचें लक्षण करण्यापूर्वीं श्रीसमर्थ ह्मणतात.

**पाहिलें नस्तां संस्कृतीं । रीग नाहीं मऱ्हाष्ट ग्रन्थीं ।**
**हृदईं वसल्यां कृपामूर्ती । सद्गुरुस्वामी ॥** ५-६-३३.
**अतां नलगे संस्कृत । अथवा ग्रंथ प्राकृत ।**
**माझा स्वामी कृपेसहित । हृदईं वसे ॥** ५-६-३४.
**न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास ।**
**प्रेत्नेंविण सौरस । सद्गुरुकृपा ॥** ५-६-३५.

ह्या तीन ओव्यांचा काय अर्थ करावयाचा बरें ? त्यांचा शब्दार्थ घ्यावयाचा काय ? श्रीसमर्थांना संस्कृत येत नव्हतें, प्राकृत ग्रन्थ त्यांनीं पाहिले नव्हते, वेदाभ्यास केला नव्हता, असें मानावयाचें काय ? नव्हे, असें मला वाटतें. कारण, दासबोध ग्रन्थाला कोणकोणत्या ग्रन्थांचा आधार आहे, हें श्रीसमर्थांनीं पहिल्या दशकाच्या पहिल्याच समासांत सांगून ठेवलें आहे.

**शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता ।**
**उत्तरगीता आवधूतगीता । वेद आणी वेदांत ॥** १-१-१८.
**भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता ।**
**गणेशगीता येमगीता । उपनिषदें भागवत ॥** १९.
**इत्यादिक नाना ग्रन्थ । संमतीस बोलिले येथ ॥** २०.

तेव्हां ' पाहिलें नस्तां संस्कृतीं ' हें कांहीं शब्दशः खरें नव्हे. श्रीसमर्थांच्या ह्मणण्याचा आशय इतकाच असावा कीं, आत्मज्ञान प्राप्त होण्यास संस्कृत, प्राकृत ग्रन्थांची किंवा वेदाभ्यास, श्रवणसायास यांची अवश्यकताच आहे असें नाहीं, किंबहुना ह्या सर्व गोष्टी घडूनही आत्मज्ञान प्राप्त होत नाहीं तें नाहींच. बारा आणि बारा चोवीस वर्षें संस्कृताचें अध्ययन होऊनही विद्वान् लोक आत्मज्ञानामध्यें कोरडे राहतात अशा कथा आपण ऐकत असतों व

वामनपंडितांची आख्यायिका तर सर्वविश्रुत आहे. सारांश आत्मज्ञान प्राप्त होण्यास विद्वत्तेची नव्हे, तर सद्गुरुकृपेची अपेक्षा असते; आणि ह्मणूनच विसाव्या दशकाच्या शेवटच्या समासांत श्रीसद्गुरु ह्मणतात,

**भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ॥**
**समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ २०-१०-३०.**

असा हा प्रासादिक ग्रन्थ आहे व धन्य आहे महाराष्ट्राची, कीं सुस्थितींत आणि दुःस्थितींत, सर्वतोपरी मार्गदर्शक असा हा ग्रन्थ त्याला लाभला आहे. ज्यांनीं सद्गुरुकृपा प्राप्त करून घेतली नाहीं, ज्यांच्या हृदयांत भगवंताचें अखंड वास्तव्य नाहीं, त्यांना संस्कृतप्राकृताची किंमत, परंतु श्रीसमर्थांना त्याचें काय होय!

**जया अंतरीं भगवंत । अचळ राहिला निवांत ।**
**तो स्वभावें जें बोलत । तें ब्रह्मनिरूपण ॥ १४-३-२५.**

श्रीसद्गुरुंच्या मुखांतून सहज निघालेले उद्गार तो हा दासबोध ग्रन्थ होय.

अशा प्रकारें, आपण संस्कृत ग्रन्थ पाहिले नाहींत, प्राकृत ग्रन्थांत आपला मुळींच शिरकाव नाहीं, आपल्याकडून वेदाभ्यास झाला नाहीं, किंवा श्रवणसायास घडले नाहींत, तर केवळ सद्गुरुमूर्ति हृदयांत ठेवून आत्मज्ञान सांगण्यास आपण प्रवृत्त होत आहोंत, अशी प्रस्तावना करून नंतर श्रीसमर्थ आत्मज्ञान ह्मणजे काय तें सांगतातः—

**अरे गहनाचेंही गहन । तें तूं जाण सद्गुरुवचन ।**
**सद्गुरुवचनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५-६-३९.**
**सद्गुरुवचन तोचि वेदांत । सद्गुरुवचन तोचि सिद्धांत ।**
**सद्गुरुवचन तोचि धादांत । सप्रचीत आतां ॥ ४०**
**जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन ।**
**जेणें माझें सामाधान । अत्यंत जालें ॥ ४१.**
**तें हें माझें जिवींचें गुज । मी सांगेन ह्मणतों तुज ।**
**जरी अवधान देसी मज । तरी आतां येच क्षणीं ॥ ४२.**
**शिष्य म्लानवदनें बोले । धरिले सदृढ पाउले ।**
**मग बोलों आरंभिलें । गुरुदेवें ॥ ४३.**
**अहं ब्रह्मास्मि माहावाक्य । येथींचा अर्थ अतर्क्य ।**
**तोही सांगतों ऐक्य । गुरुशिष्य जेथें ॥ ४४.**

ऐक शिष्या येथींचें वर्म । स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म ।
येविषयीं संदेह भ्रम । धरूंचि नको ॥ ४५.
नवविधा प्रकारें भजन । त्यांत मुख्य तें आत्मनिवेदन ।
तें समग्र प्रकारें कथन । कीजेल आतां ॥ ४६.
निर्माण पंचभूतें यीयें । कल्पांतीं नासतीं येथान्वयें ।
प्रकृति पुरुष जियें । तेही ब्रह्म होती ॥ ४७.
दृश्य पदार्थ आटतां । आपणहि नुरे तत्वतां ।
ऐक्यरूपें ऐक्यता । मुळींच आहे ॥ ४८.
सृष्टीची नाहीं वार्ता । तेथें मुळींच ऐक्यता ।
पिंड ब्रह्मांड पाहों जातां । दिसेल कोठें ४९.
ज्ञानवन्ही प्रगटे । तेणें दृश्य केर आटे ।
तदाकारें मूळ तुटे । भिन्नत्वाचें ॥ ५०.
मिथ्यत्वें वृत्ति फिरे । तों दृश्य असतांच वोसरे ।
सहजचि येणें प्रकारें । जालें आत्मनिवेदन ॥ ५१.
असो गुरूचें ठाईं अनन्यता । तरी तुज कायेसी रे चिंता ।
वेगळेपणें अभक्ता । उरोंचि नको ॥ ५२.
आतां हेंचि दृढीकर्ण । व्हावया करी सद्गुरुभजन ।
सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५३.
या नाव शिष्या आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान ।
भवभयाचें बंधन । समूळ मिथ्या ॥ ५४.

समग्र श्रीमत् दासबोध ग्रन्थच अत्यन्त पवित्र आहे, तरी पण त्या सर्व पवित्र ग्रन्थांत वरील सोळा ओव्या पवित्रतम आहेत. ह्या सोळा ओव्या खुद्द श्रीसमर्थांनाही पवित्र असल्या पाहिजेत. याचें कारण उघडच आहे. समग्र दासबोध हा श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेला ग्रन्थ होय, परंतु ह्या सोळा ओव्यांत श्रीसमर्थांच्याही समर्थांचें वचन दिलेलें आहे. आपण श्रीरामदास स्वामींना समर्थ ह्मणतों, पण ते स्वतः श्रीरामचंद्राला समर्थ ह्मणत असत. समर्थांना खुद्द श्रीरामचंद्राचा अनुग्रह झाला होता, व वरील ओव्यांत ते आपल्या स्वामिचें ह्मणजे श्रीरामचंद्राचें वचन देत आहेत हें उघड आहे. तें वचन खुद्द त्यांना कितीतरी प्रिय असेल बरें? असें तें आपल्या " जिवीचें गुज " श्रीसमर्थांनीं शिष्याची आतुरता पाहून वरील ओव्यांत सांगितलें आहे.

ह्या सोळा ओव्यांत काय आलें नाहीं ? आरंभीं सद्गुरुवचनाचें महत्त्व सांगून मग प्रत्यक्ष सद्गुरुवचन दिलें आहे व पुढें फलश्रुतिसह त्याचें स्पष्टीकरण करून तें दृढ होण्याचा मार्ग दर्शविला आहे. वेदांत, सिद्धांत, धादांत सर्व कांहीं सद्गुरुवचन आहे, श्रीसमर्थांचेंही ह्याच सद्गुरुवचनापासून समाधान झालें आहे. तें सद्गुरुवचन म्हणजे

**अहं ब्रह्मास्मि ।**

हें महावाक्य होय. आपण म्हणजे कांहीं आपलें शरीर नव्हे. शरीर हें पंचभूतात्मक आहे व पंचभूतें हीं नाशवंत आहेत. आपण आणि ब्रह्म हीं एकच आहोंत. आपण स्वतःच ब्रह्म आहोंत, ह्या सद्गुरुवचनावर ज्याचा विश्वास बसेल त्याला कशाचीच चिंता वाटणार नाहीं. आपणही ब्रह्म व सद्गुरुही ब्रह्म अशा प्रकारें गुरुशिष्यांचें ऐक्य होणें याचें नांव भक्ति, व गुरूच्या ठायीं ज्याची अशी अनन्यता होते तोच खरा भक्त. श्रीसमर्थांनीं भक्ताची व्याख्या इतरत्रही अशीच केली आहे.

**विभक्तपणें नसावें । तरीच भक्त ह्मणवावें ॥** ११-८-१३.

भक्तीचें पर्यवसान देव आणि भक्त यांचें ऐक्य होण्यांतच आहे.

**उपासनेचे सेवटीं । देवा भक्ता अखंड भेटी ।**
**अनुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥** १८-२-३०.

सद्गुरुवचनाचा अर्थ समजल्यावर तो अंतःकरणांत दृढ होण्यास सद्गुरुभजन हाच श्रेष्ठ उपाय होय. सद्गुरुभजनाचें फळ प्राप्त झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं. आत्मज्ञान तें हेंच.

वरील सोळा ओव्यांत आत्मज्ञानाचें जें लक्षण केलें आहे, त्याचाच विस्तार साहाव्या दशकापासून तों अखेरपर्यंत करण्यांत आला आहे.

**स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म ।**

या महावाक्याचा बोध करून देण्यासाठीं श्रीमत् दासबोधाची प्रवृत्ति होय. तत्त्वमसि ॥ तें तूं आहेस, यांत तें ह्मणजे काय व तूं ह्मणजे काय याचें जें श्रीसमर्थांनीं निरूपण केलें आहे त्याचें आपण सार काढूं.

**ब्रह्म ह्मणजे काय ?**

ब्रह्म ह्मणजे काय हें सांगून समजावयाचें नाहीं व तें सांगतांही यावयाचें नाहीं.

ब्रह्म ह्मणून कांहीं जड पदार्थही नव्हे कीं तो एकानें दुसऱ्याला उचलून द्यावा

**पदार्थाऐसें ब्रह्म नव्हे । मा तें हातीं धरून द्यावें ।**
**असो हें अनुभवावें । सद्गुरुमुखें ॥** ७-३-५२.

सद्गुरुमुखानेंच ब्रह्माचा अनुभव घ्यावा. श्रवणादिकरून साधनें आहेत खरीं, परंतु ब्रह्माचा निश्चय सद्गुरुमुखावांचून अन्य मार्गानें व्हावयाचा नाहीं.

**पुस्तकज्ञानें निश्चये धरणें । तरी गुरु कासया करणें ॥** १२-६-३०

असेंच समर्थ विचारतात. ब्रह्म कसें आहे हें शब्दांनीं सांगतां येत नाहीं, त्याचें कितीही लक्षण केलें तरी त्याहून तें निराळेंच उरतें.

**ब्रह्म शब्दीं ऐसें तैसें । बोलिजे त्याहूनि अनारिसें ।**
**परी तें श्रवणअभ्यासें । पाविजे ब्रह्म ॥** ७-२-७.

ब्रह्म बोलून दाखविण्यासारखें जरी नसलें तरी श्रवणादि साधनद्वाराच त्याची प्राप्ति व्हावयाची असते, यासाठीं तत्स्वरूपाचा बोध व्हावा अशी इच्छा असल्यास साधुसंतांनीं जें निरूपण करून ठेविलेलें आहे, तें वाचणें अगत्याचें आहे.

**परब्रह्मायेवढें थोर नाहीं । श्रवणापरतें साधन नाहीं ।**
**कळल्याविण कांहींच्च नाहीं । सामाधान ॥** २०-२-९.

परब्रह्मायेवढें थोर दुसरें कांहीं नसून तें आपणांस दिसत नाहीं, याला काय ह्मणावें ? परंतु तें आपणांस जरी दिसत नसलें तरी आपण साधुवचनावर विश्वास ठेवून राहिलें पाहिजे. साधु सांगतात,

**दिसेना तरी काये जालें । परंतु तें सर्वत्र संचलें ।**
**सूक्ष्मचि कोंदाटलें । जेथें तेथें ॥** ६-२-१९.
**दृष्टीस लागली सवे । जें दिसेल तेंचि पाहावें ।**
**परंतु गुज तें जाणावें । गोप्य आहे ॥** ६-२-२०.

तर मग तें आहे तरी काय ? तें काय आहे हें सांगतां येत नाहीं, पण तें काय नाहीं हें सांगतां येतें.

**पृथ्वी नव्हे आप नव्हे । तेज नव्हे वायु नव्हे ।**
**वर्णवेक्त ऐसें नव्हे । अव्यक्त तें ॥** ६-२-२६.

मोठें नवल आहे ! तें आहे ह्मणतां, तें सर्वत्र आहे ह्मणतां तरी तें आढळत कांहीं नाहीं. . . . . .

शरीर अवघें व्यापलें । परी तें नाहीं आडळलें ।
जवळिच हुरावलें । नवल कैसें ॥ ७-४-३३.

नवल तर खरेंच. कारण त्याचें वर्णन श्रीमत् दासबोधांत हजारों ठिकाणीं आलें आहे, त्यावरून कांहीं अटकळ बांधावी असें आपण ह्मणतों तों सद्गुरु ह्मणतात,

तें आठवितां विसरिजे । कां तें विसरोनि आठविजे ।
जाणोनियां नेणिजे । परब्रह्म तें ॥ ७-७-१९.

यांत आतां काय जाणावें ? जाणावें ह्मटलें तर तें न जाणलें पाहिजे. आठवावें ह्मटलें तर तें विसरलें पाहिजे. सारांश याचा अर्थ असा दिसतो कीं, ब्रह्म जाणावयाचें ह्मणजे कोणतीच वृत्ति शिल्लक राहिली न पाहिजे. त्या ठिकाणीं ज्ञानाचें विज्ञान व मनाचें उन्मन झालें पाहिजे. ब्रह्म पाहावयास गेलों तर तें दिसत नाहीं, आणि पाहावयास न गेलों तर तें दिसतें, अशी ब्रह्माची कांहीं विचित्रता आहे.

जाणे ब्रह्म जाणे माया । जाणे अनुभवाच्या ठाया ।
ते येक जाणावी तुर्या । सर्वसाक्षिणी ॥ ७-४-४९.

अशी सर्वसाक्षिणी तुर्या अवस्था आहे. परंतु ही तरी एक वृत्तिच होय. कारण,

साक्षत्व वृत्तीचें कारण । उन्मनी ते निवृत्ति जाण ।
जेथें विरे जाणपण । विज्ञान तें ॥ ७-४-५०.

परंतु परब्रह्माच्या संबंधानें तें विज्ञान सुद्धां शिल्लक उरलें न पाहिजे.

जेथें अज्ञान सरे । ज्ञान तेंहि नुरे ।
विज्ञानवृत्ति मुरे । परब्रह्मीं ॥ ७-४-५१.

असें हें विकट ब्रह्मस्वरूप समजावें तरी कसें ?

मायात्यागें समजावें । परब्रह्म ॥ १४-९-३०.

## माया ह्मणजे काय ?

एक परब्रह्म काय तें खरें बाकी सगळी माया.

येक परब्रह्म संचलें । कदापी नाहीं विकारलें ।
त्यावेगळें भासलें । तें भ्रमरूप ॥ १०-६-९,

**भ्रमरूप विश्व स्वभावें । तेथें काय ह्मणोन सांगावें ।**
**निर्गुण ब्रह्मावेगळें अघवें । भ्रमरूप ॥** १०-६-३६.

एका ब्रह्माशिवाय बाकी सर्व भ्रम. बाकी सर्व भ्रम पण कोणाला ? ज्याला समजेल त्याला, नाहींपेक्षां आपणांस हा भ्रमच सत्य आहे व सत्य वस्तुच असत्य आहे. ह्या मायेसंबंधानें एकंदर ग्रन्थांत पुष्कळच ठिकाणीं विवेचन करण्यांत आलें आहे, पण त्यांत मला तीन समास फार गोड आणि महत्वाचे वाटतात. द० ११ स० ७ यांत मायेला नदी कल्पून तिचें वर्णन केलें आहे. या मायानदींत पोहणारांची काय दशा होते, तिचें वर्णन मोठें मौजेचें आहे. या नदींत,

**येक ते वाहतचि गेले । येक वळशामधें पडिले ।**
**येक सांकडींत आडकले । अधोमुख ॥** ११-७-८.
**येक आपटआपटोंच गेलीं । येक चिरडचिरडोंच मेलीं ।**
**कितीयेक ते फुगलीं । पाणी भरलें ॥** ११-७-९.
**येक बळाचे निवडले । ते पोहतचि उगमास गेले ।**
**उगमदर्शनें पवित्र जाले । तीर्थरूप ॥** ११-७-१०.

ही नदी तरून जाण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें आपण तिच्या ओघाबरोबर वाहवत चाललों आहोंत. कोठें जाऊन लागूं याचा नियम नाहीं. या नदीचें पाणी फार ओढ घेतें. मोठमोठे पोहणारे देखील तत्काळ गटंगळ्या खाऊं लागतात. परंतु जे तिचें स्वरूप जाणतात, ते आपल्या ज्ञानबळाच्या योगानें थेट उगमापर्यंत उलट पोहत जातात. या नदीचा उगम ब्रह्माचलापासून आहे, तेथपर्यंत ते जातात, आणि तेथें गेल्यावर आपण इतक्या प्रयासानें जी नदी तरून आलों ती पाहण्यासाठीं ते मागें वळून पाहतात तों तेथें काय आहे ? नदी नाहीं व पाणीही नाहीं; तेथें कांहीं नाहीं. ज्ञान होण्यापूर्वी जी नदी भयंकर वाटते, जिचें अफाट पाणी पाहून डोळे फाटून जातात व हात पाय गळतात, तीच नदी ज्ञानोत्तर केवळ भ्रममूल आहे असें आढळून येतें.

**उगमापैलिकडे गेलें । तेथें परतोन पाहिलें ।**
**तव तें पाणीच आटलें । कांहीं नाहीं ॥** ११-७-२१.

पाणी नव्हतेंच मुळीं. मृगजलांतच आपण बुडत होतों. मायेचें हें मिथ्या स्वरूप द, १४ स० १० यांत अनेक दृष्टान्त देऊन समजावून सांगितलें

आहे. या समासाच्या ओव्या अवघ्या २१ आहेत. त्या सर्व मूळ पोथीवरून वाचकांनीं वाचाव्या. तसेंच द० १५×७ त माया हा वेल कल्पिला आहे. त्या वेलाचें,

**मूळ खाणोन काढिलें । प्रत्ययें ज्ञानें निर्मूळ केलें ।**
**तरी मग वाढणेंचि राहिलें । सकळ कांहीं ॥** १५-७-१६.

अशी ही मिथ्या माया आहे. "मिथ्या" ह्मणजे "कांहीं नाहीं". अर्थात् जी नाहींच मुळीं, ती कोणीं केली अथवा कशी निर्माण झाली हा प्रश्नच उरत नाहीं.

**मिथ्या शब्दीं कांहींच नाहीं । तेथें केलें कोणें काइ ॥**८-२-५४.

अथवा,

**केलें तें आवघेंचि लटिकें । तरी कर्ता हें बोलणेंचि फिकें ।**
**वक्ता ह्मणेरे विवेकें । बरें पहा ॥** १३-८-२५.

ह्या ह्मणण्यानें आपले समाधान होत नाहीं. प्रत्यक्ष जगाचा व्यवहार दिसत असतां तो मिथ्या आहे असें सांगितल्यानें आपणांस उमज पडत नाहीं. माया मिथ्या आहे असें ह्मटल्यानें थोडीच ती सुटते आहे?

**माया मिथ्या ह्मणतां गेली । हे वार्ता नाहीं ऐकिली ।**
**मिथ्या ह्मणतांच लागली । समागमें ॥** ८-२-३५.

यावर श्रीसद्गुरु ह्मणतात कीं जें दिसतें तें सत्यच असतें असा कांहीं नियम नाहीं, आणि शिवाय आपला देह अविद्यात्मक व जगत्‌ही अविद्यात्मकच आहे, आणि ह्मणून लटक्याला लटकें खरें वाटत आहे.

**दृश्य भास अविद्यात्मक । तुझाहि देहो तदात्मक ।**
**ह्मणोनि हा अविवेक । तेथें संचरला ॥** ६-८-२७.

"देह तोच मी" असें मानणाराला जगत् सत्य वाटावें हें अगदीं साहजिक आहे.[द० ६×८ ]. पण मग, हें सारें दिसतें आहे तें काय? तो भास आहे. ब्रह्माच्या अधिष्ठानामुळें मूळमाया व मूळमायेपासून हा सारा पसारा भासमान होत आहे. आकाश निश्चळ असून त्यांत जशी वायूची झुळुक उठावी तद्वत् ही मूळमाया विवर्तरूप आहे. वायूच्या योगानें आकाशांत फरक पडत नाहीं, तसाच मूळमायेच्या योगानें ब्रह्मस्थितींत पालट होत नाहीं. वायु दाखवितां येत नाहीं, तशी मूळमाया दाखवितां येत नाहीं, परंतु वायूच्या योगानें केर

उडतांना जसा आपण पाहातों तसें मूळमायेच्या योगानें हें जग दृश्यमान होत आहे. आकाशांत ढग येतात आणि जातात तरी आकाश आपलें जसेंच्या तसेंच असतें; त्याप्रमाणें ब्रह्म जसेंच्या तसेंच राहून, माया मात्र येते आणि जाते.

**ऐसी माया उद्भवली। वस्तु निर्गुण संचली।**
**अहं ऐसी स्फूर्ति जाली। तेचि माया॥** ८-३-५१.

वास्तविक दोरी असून, तिच्या अधिष्ठानामुळें आपणांस जसा सर्पाचा भास होतो—नव्हे—सर्प आहे असें खरें खरें वाटतें, तद्वत् हें जग आपणांस सत्य वाटत आहे. परंतु सूर्याच्या अधिष्ठानामुळें भासमान होणारें मृगजल, हें जल नसून केवळ भास आहे, असें हरिणाला सांगितलें तरी त्या पाण्यामागें धापा टाकित जाण्याचा छंद जसा हरिण सोडीत नाहीं, तद्वत् कोणी कांहीं सांगितलें तरी आपण जगाचा व्यवहार सत्य मानूनच तो करीत राहणार. उघड आहे,

**सिद्धांचें जें निरूपण। तें साधकांस न मने जाण।**
**पक्क नाहीं अंतःकर्ण। ह्मणोनियां॥** ८-३-१७.

जें निरूपण सिद्धांच्या साठीं आहे तें अपक्क बुद्धीच्या आपणांस कसें उलगडावें?

**जयाचे अंतरी ज्ञान। नाहीं वोळखिले सज्जन।**
**तयास माया मिथ्याभान। सत्यचि वाटे॥**

पण अशा ह्या मिथ्या मायेचें यथार्थ स्वरूप आपणांस केव्हांच कळणार नाहीं असें मात्र नव्हे.

**सकळ माया गथागोवी। संतसंगें उगवावी।**
**पाविजे मोक्षाची पदवी। सत्समागमें॥** ८-५-७०.

सत्संग धरावा, श्रवण मनन निदिध्यास सोडूं नये, ह्मणजे आज जें नुसतें शब्दज्ञान होत आहे त्याचें अर्थज्ञान केव्हां तरी झाल्यावांचून राहणार नाहीं, अशाविषयीं श्रीसद्गुरु ग्वाही देत आहेत. अर्थात् शब्दज्ञान करून घेण्याविषयीं हयगय करितां कामा नये.

ब्रह्मांडाची वंशावळ श्रीमत् दासबोधांत पुष्कळदां आली आहे. पुन्हः-पुन्हां तीच ती गोष्ट सांगितली आहे. कोठें कोठें तर आदल्या समासांत जें निरूपण असतें तेंच पुन्हां पुढल्या समासांत केलेलें आढळतें. ब्रह्मांडाची उभारणी आणि संव्हारणी हा विषय दासबोधांत कितीतरी वेळां आला आहे.

(११×१; १२×६; १३×३; १३×४ वगैरे.) आपण पुनरुक्ति करीत आहों, ही गोष्ट श्रीसमर्थांच्या लक्षांत आली नव्हती असें नाहीं, किंबहुना ती त्यांनीं जाणून बुजून केलेली आहे. एक दोन ठिकाणीं त्यांनीं ह्मटलेंहि आहे कीं,

**संदेहवृत्ति ते न भंगे ।**
**ह्मणोनि बोलिलेंचि बोलावें लागे ॥** ६-३-३७.

किंवा

**सूक्ष्म निरूपण लागलें । तेथें बोलिलेंचि मागुतें बोलिलें ।**
**श्रोत्यांस पाहिजे उमजलें । ह्मणोनियां ॥** १०-८-३०.

शिवाय असेंही होत असावें, कीं कांहीं शिष्यांना एकवार सांगून समजू नये, किंवा आज समजलेलें उद्यां पुन्हां त्यांनीं विसरून जावें. सद्गुरु ह्मणतातच कीं,

**कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें ॥**
**विवरलेंचि विवरावें । पुन्हा निरूपण ॥** ११-५-१.
**तैसें आह्मांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडिलें ॥**

कारण काल जें शिष्यांना समजलें होतें तें आज पुन्हां ते विसरून गेलेले आहेत.

**कां जें विघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ॥** ११-५-२.

अशा कारणामुळें ब्रह्मांडाच्या उत्पत्तीचें निरूपण दासबोधांत अनेकदां आलें असावें.

## ब्रह्मांडाचा वंशवृक्ष.

ब्रह्म–मूळमाया–गुणमाया–त्रिगुण–आकाश–वायु–तेज–आप्–पृथ्वी–अन्न–रेत–प्राणी

असा ब्रह्मांडाचा विस्तार आहे. ( ८×४, १३×३ इत्यादि ) ब्रह्मांपासून तों पंचभूतांपर्यंत वर दिल्याप्रमाणें पायऱ्या आहेत खऱ्या, परंतु वास्तविक पाहूं गेल्यास मूळमायेंतच पंचभूतांचा समावेश होतो. मूळमायेपासून पंचभूतांपर्यंतच्या पायऱ्या नुसत्या नांवाच्या आहेत. मूळमाया म्हणजेच गुणमाया म्हणजेच त्रिगुण ह्मणजेच पंचभूतें पंचभूतांत देखील प्रत्येक भूत अगदीं स्वतंत्र आहे असें नाहीं, तर प्रत्येक भूतांत बाकीच्या चारी भूतांचा अंश

आहे. पंचभूतांपासून तों मूळमायेपर्यंतच्या पायऱ्या समजल्या पाहिजेत. प्रत्येक पायरीच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान आपण करून घेतलें पाहिजे.

मूळमाया अनेक नांवांनीं प्रसिद्ध आहे. द० १०×१० त मूळमायेचीं पुरुष, स्त्री, नपुंसक नांवें दिलेलीं आहेत. द० १०×९ यांत मूळमायेचें स्वरूप वर्णन केलें आहे. हा समास मननपूर्वक मूळावरून वाचावा. मूळमाया= वायु+जाणीवकळा ( जगज्जोति=प्रकृति+पुरुष=शिवशक्ति=शंकरपार्वती=अर्धनारीनटेश्वर ब्रह्माच्या ठिकाणीं अहं अशी जी स्फूर्ति ती मूळमाया.

**आकाशीं वायो जाला निर्माण । तैसी ब्रह्मीं मूळमाया जाण**
**त्या वायोमधें त्रिगुण । आणी पंचभूतें ॥** १०-९-१.

मूळमाया वायुरूप आहे व वायु पंचभूतात्मक आहे आणि म्हणून मूळमाया पंचभूतात्मक आहे.

**मूळमायेचें चळण । तेंचि वायोचें लक्षण ॥** ८-३-५६.

आणि

**एवं पंचभूतिक पवन । तेंचि मूळमाया जाण ।**
**माया आणी सूक्ष्म त्रिगुण । तेहि पंचभूतिक ॥** ८-४-४१.

किंवा

**ते मूळमायेचें लक्षण । वायो स्वरूपचि जाण ।**
**पंचभूतें आणि त्रिगुण । वायोआंगीं ॥** १०-३-२.

किंवा

**ब्रह्मीं मूळमाया जाली । तेचि अष्टधा प्रकृति बोलिली ।**
**भूतीं त्रिगुणीं कालवली । मूळमाया ॥** १०-४-९.
**ते मूळमाया वायोस्वरूप । वायोमधें जाणीवेचें रूप ।**
**तेचि इच्छा परी आरोप । ब्रह्मीं न घडे ॥** १०-४-१०.

मूळमाया वायुस्वरूप आहे व वायूमध्यें जाणिव आहे. ही जी जाणीव तोच ईश्वर.

**वायोमध्यें जाणीव गुण । तेंचि ईश्वराचें लक्षण ।**
**तयापासून त्रिगुण । पुढें जाले ॥** १०-९-११.
**देव देवता देवतें भूतें । पृथ्वीमध्यें असंख्यातें ।**
**परंतु यां समस्तांतें । वायोस्वरूप बोलिजे ॥** १०-३-९.

**वायोस्वरूप सदा असणें । प्रसंगें नाना देह धरणें ।**
**गुप्त प्रगट होणें जाणें । समस्तांसी ॥** १०-३-१०.

या त्रिगुणांपैकीं सत्वगुणाचा देहधारी विष्णु, रजाचा देहधारी ब्रह्मा व तमाचा देहधारी महेश होय. ( १०X४ )

वरील एकंदर विवेचनावरून मूळमायाच काय ती कर्ती आहे व त्रिगुण काय आणि पंचभूतें काय, तिच्याच स्वरूपाचीं रूपांतरें आहेत ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आली असेल. मूळमायेपासून तों सृष्टीच्या जड रूपापर्यंत सर्व मायाच होय. एक ब्रह्म आणि दुसरी मूळमाया; बाकी सर्व त्या मूळमायेचा पसारा आहे.

**मुळीं जाली ते मूळमाया । त्रिगुण जाले ते गुणमाया ।**
**जडत्व पावली ते अविद्या माया । सृष्टिरूपें ॥** ११-१-९-

अशा ह्या मूळमायेच्या स्वरूपाचें जोंपर्यंत आपणांस यथार्थ ज्ञान होणार नाहीं, तोंपर्यंत ब्रह्माची आणि आपली गांठ पडणार नाहीं. उघडच आहे, मूळमायेच्या वरची पायरी ब्रह्म. ती मूळमायाच जर ओळखली नाहीं तर ब्रह्माची ओळख कशी होणार ? महाद्वार ओलांडून आंत गेल्याशिवाय देवदर्शन कसें घडावें ?

**महाद्वार वोलांडावें । मग देवदर्शन घ्यावें ।**
**तैसें दृश्य हें सांडावें । जाणोनियां ॥** ८-४-५८.

या ठिकाणीं सद्गुरु एक इषारा देऊन ठेवतात, कीं महाद्वार ओलांडल्यावर थोडेंसें जपावयाचें असतें. मूळमाया ओलांडून पुढें गेल्यावर शून्यत्व लागतें, त्यालाच ब्रह्म कल्पून कित्येक समाधान मानतात. तरी असें करूं नये. त्याच्याहि पलीकडे जावें म्हणजे सत्य वस्तूची भेट होते.

**दृश्य अवघें वोलांडिलें । अदृश्य सुन्यत्वीं पडिलें ।**
**ब्रह्म ह्मणौनि मुरडलें । तेथुनिच मागें ॥** ८-१०-६५.
**इकडे दृश्य तिकडे देव । मध्यें सुन्यत्वाचा ठाव ।**
**तयास मंदबुद्धीस्तव । प्राणी ब्रह्म ह्मणे ॥** ८-१०-६६.

तेव्हां

**आधीं दृश्य सोडिलें । मग सुन्यत्व वोलांडिलें ।**
**मूळमायेपरतें देखिलें । परब्रह्म ॥** ८-१०-७०.

तात्पर्य, मूळमायेचा त्याग केल्याशिवाय परब्रह्माची भेट व्हावयाची नाहीं; आणि माया ही मिथ्या असूनहि तिचा त्याग तर करवत नाहीं. असें कां व्हावें ?

**माया मिथ्या ऐसी कळली ।**
**तरी मग भीड कां लागली ॥** २०-३-२३.

मूळमायेचा त्याग करणें अवश्य दिसत असूनहि तिचा त्याग कां करवत नाहीं ?

**अभेदामाजीं वाढवी भेदा । ते हे अहंता ॥** ९-२-१५.

अहंतेच्या योगानें, मीपणाच्या योगानें, देहबुद्धीच्या योगानें, सारांश अज्ञानपणामुळें मायात्याग होत नाहीं व ब्रम्हस्वरूपाची ओळख पटत नाहीं.

**आपण ह्मणिजे मीपण । मीपण ह्मणिजे जीवपण ।**
**जीवपण ह्मणिजे अज्ञान । संग जडला ॥** ७-२-२०.
**सोडितां तया संगासी । ऐक्य होये निःसंगासी ॥**७-२-२१.

ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं कोणतीच कल्पना किंवा वृत्ति उरत नाहीं म्हणतात ती अशी, मीपणाचाच संग सोडल्यावर तेथें कल्पना कशी उरणार ? ब्रह्मस्वरूपीं अहंभाव मुळीं उरतच नाहीं. मीपणाची प्रौढी व्यवहारांत कोणीं मिरविली तर कदाचित् चालेल, परंतु ती प्रौढी ब्रह्मापुढें टिकत नाहीं. ब्रह्मापुढें मीपणा विरघळून गेलाच पाहिजे.

**देहबुद्धीचें थोरपण । परब्रह्मीं न चले जाण ।**
**तेथें होतसे निर्वाण । अहंभावासी ॥** ७-२-२३.

अहंभाव नाहींसा झाल्यावर म्हणजे देहबुद्धि नष्ट झाल्यावर, मग हा ब्राह्मण, हा क्षत्रिय, हा वैश्य आणि हा शूद्र, किंवा हा राजा व हा रंक किंवा ही स्त्री व हा पुरुष, असा भेद कसा उरणार ?

**उंच नीच नाहीं परी । राया रंका येकिच सरी ।**
**जाला पुरुष अथवा नारी । येकचि पद ॥** ७-२-२४.

आणि म्हणून

**साधु दिसती वेगळाले । परी ते स्वरूपीं मिळाले ।**
**अवघे मिळोन येकचि जाले । देहातीत वस्तु ॥** ७-२-३१.

साधुसाधूंत लहानमोठेपणा हुडकून काढण्याचा आपणांस अधिकार नसतांही कित्येक वेळां हा साधु मोठा कां तो साधु मोठा, असा वाद व्यावहारिक प्र-

माणांच्या जोरावर करण्यास जेव्हां आपण प्रवृत्त होतों, त्यावेळीं ह्या ओवीची आपणांस जर आठवण होत जाईल तर असला अव्यापारेषु व्यापार करतांना आपलें मन कचरेल, असें मला वाटतें, असो.

मीपणाचा ताठा धरून व्यवहारांत देखील यश येत नाहीं. मीपणाच्या योगानें प्रपंच सुरळीत चालत नाहीं. मित्रामित्रांत अहंभावामुळें वैमनस्य येतें. राष्ट्राराष्ट्रांत मीपणाच्या घमेंडींत कलह माजतात. असा प्रकार क्षुद्र व्यवहारांत देखील जर आपण पाहतों, तर मीपणाचा अभिमान बाळगून भगवंत कसा जोडला जाईल बरें ?

**मीपण कोणासिच न साहे । तें भगवंतीं कैसेनि साहे ।**
**ह्मणौनि मीपण सांडून राहे । तोचि समाधानी ॥** ७-७-५०.

मीपणाच्या योगानें मायात्याग होत नाहीं व मायात्याग होत नाहीं ह्मणून ब्रह्मस्वरूपाची ओळख पटत नाहीं.

**मीपणें वस्तु नाकळे । मीपणें भक्ति मावळे ॥**
**मीपणें शक्ति गळे । वैराग्याची ॥** ७-७-४६.

तात्पर्य, देहबुद्धि नष्ट झाली पाहिजे. देह म्हणजे काय व मी कोण याचा विचार करून मुमुक्षूंनें देहबुद्धीचा त्याग करण्यास शिकलें पाहिजे. खरें हित देहातीत आहे, तेव्हां देहाला घट्ट धरून हित कसें व्हावें? अनन्य भक्तीवांचून मुक्ति नाहीं व देहबुद्धि हृदयाशीं बाळगून अनन्य भक्ति व्हावयाची नाहीं. ह्मणून

**च्यारी देह निरसावे । साधकें देहातीत व्हावें ।**
**देहातीत होतां जाणावे । अनन्य भक्त ॥** १०–१०–४७.

अनन्य भक्ति आणि मीपणा या दोन वस्तु एकत्र कधीं असूं शकणार नाहींत, यासाठीं

**मीपणापासून सुटला । तोचि येक मुक्त जाला ॥** ७-६-५४.

किंवा

**जेथें मुरालें मीपण । तेचि अनुभवाची खूण ॥** ६–१०–१७.

ह्मणून

**संग सोडावा आपुला । मग पाहावें तयाला ।**
**अनुभवी तो या बोला । सुखावेल गा ॥** ७-२-१९.

## मीपण ह्मणजे काय?

मीपण ह्मणजे देहबुद्धि. देह तोच मी, असा अध्यास असणें याचें नांव अहंता.

**मी जीव मज बंधन । मज आहे जन्ममरण ॥ ८-७-६.**

याचें नांव मीपण. या मीपणाचें ह्मणजे अष्टदेहाचें निरसन झालें पाहिजे. स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण असे चार पिंडाचे व विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत आणि मूळप्रकृति असे चार ब्रम्हांडाचें, दोन्ही मिळून आठ देह आहेत. त्या अष्टदेहांचा विचार करून त्यांचें निरसन केलें पाहिजे. १७ व्या दशकाच्या ८ व्या समासांत या देहांचें वर्णन केलें आहे, ते मननपूर्वक वाचल्यास समजतें. वास्तविक देह म्हणजे काय आहे?

**तत्वें तत्व मेळविलें । त्यासी देह हें नाम ठेविलें ।**
**तें जाणते पुरुषीं शोधिलें । तत्वें तत्व ॥ ६-३-२०.**

अशा दृष्टीनें देहाचा विचार केला म्हणजे मग त्या देहाबद्दल आपणांस असें अहंता कशास पाहिजे? कशास पाहिजे, असें नुसतें म्हटल्यानें देहममता सुटत नाहीं, तरीपण विचाराला ही गोष्ट पटते, कीं खरोखरच देह हें पंचभूतांचें एक गांठोडें आहे; तें गांठोडें विचारानें सोडून पाहिलें तर त्यांत पंचभूतेंच आढळणार. या पंचभूतांपासून आपलें स्वरूप भिन्न आहे. आपण पृथ्वी, आप्, तेज, वायु आकाश यांपासून निराळे आहोंत. परंतु

**तत्वीं वेटाळून घेतला । प्राणी संशयें गुंडाळला ।**
**आपणासी आपण भुलला । कोहं ह्मणे ॥ ६-३-३४.**

अशी आपली स्थिति झाली आहे. परंतु विचार करून पाहिलें तर आपणांस कबूल करावें लागतें कीं, आपण कांहीं पंचभूतात्मक नसून ब्रह्म आहोंत. आपण ब्रह्म आहोंत, ही द्वैतकल्पना सुद्धां खरोखर उरत नाहीं. ती कशी उरावी? ब्रह्मापासून आपण निराळे असतों तर मग आपण ब्रह्म आहोंत असें आपणांस बोलतां आलें असतें.

**वस्तु येक आपण येक । ऐसी अस्ती वेगळिक ।**
**तरि अनुभवाचा विवेक । बोलों येता सुखें ॥ ६-१०-३४.**

किंबहुना, जोंपर्यंत आपण वेदांताच्या व ब्रह्मस्वरूपाच्या गोष्टी मारीत आहोंत तोंपर्यंत आपणांस यथार्थ ज्ञान झालेंच नाहीं म्हणून समजावें लागेल.

**हें न बोलतांच विवरिजे । विवरोन विवरोन राहिजे ।**
**मग अबोलणेंचि साजे । माहापुरुषीं ॥** ९-२-३४.

गुरोस्तु मौनं व्याख्यानम् । हें किती खरें आहे! अशी स्थिति बाणली म्हणजे साधकाच्या तोंडून पुढीलच उद्गार निघावयाचे:—

**प्रचित आलिया अनुमान । हा तों प्रत्यक्ष दुराभिमान ।**
**तरी आतां मी अज्ञान । मज कांहींच न कळे ॥** ९-२-३६.
**मी लटिका माझें बोलणें लटिकें ।**
**मी लटिका माझें चालणें लटिकें ॥**
**मी माझें आवघेंचि लटिकें ।**
**कल्पनिक ॥** ९-२-३७.
**मज मुळींच नाहीं ठाव । माझें बोलणें अवघेंचि वाव ॥**
**हा प्रकृतीचा स्वभाव । प्रकृती लटिकी ॥** ९-२-३८.

**वगैरे.** तात्पर्य,

**तत्वीं गुंतला ह्मणे कोहं । विवेक पाहतां ह्मणे सोहं ।**
**अनन्य होतां अहं सोहं । मावळलीं ॥** ६-३-३५.
**याउपरी उर्वरित । तेंचि स्वरूप संत ।**
**देहीं असोनि देहातीत । जाणिजे ऐसा ॥** ६-३-३६.

**पण,** ही देहबुद्धि झडावी कशी? मीपणाचें हें बंधन तुटावें कसें? बंधन खरोखर नसून केवळ देहाभिमानाच्या योगानें लोक भ्रांत झालेले आहेत, हें आपण म्हणता तें खरें आहे; पण त्या बंधनानें सारें जग बद्ध झालेलें आहे, हेंही कांहीं खोटें नाहीं. बंधन मिथ्या आहे असें तर वाटतें पण तें सुटत कांहीं नाहीं. याला उपाय काय करावा ?

**बंधन ह्मणिजे कांहींच नाहीं । परी वेढा लाविलें सर्वेही ।**
**यास उपावचि नाहीं । कळल्यावांचुनी ॥** ९-७-४७.

**कळल्यावांचून** म्हणजे ज्ञानावांचून गत्यन्तर नाहीं.

**आपण वस्तु मुळीं येक । ऐसा ज्ञानाचा विवेक ॥** ८-१०-८१.

तो विवेक उमजला पाहिजे. अष्ट देहांचें निरसन झालें पाहिजे. उपासनेच्या योगानें मूळमायेच्या स्वरूपाचा बोध करून घेतला पाहिजे. मनाचें उन्मन व ज्ञानाचें विज्ञान झालें पाहिजे; आणि असें झालें म्हणजे;—

**जन्ममरणाचें चुकलें । पाप अवघेंचि बुडालें ।**
**येमयातनेचें जालें । निसंतान ॥ १२-३-३०.**
**निर्वेद अवघाचि तुटला । विचारें मोक्ष प्राप्त जाला ।**
**जन्म सार्थकाचि वाटला । सकळ कांहीं ॥ १२-३-३१.**
**नाना किंत निवारिले । धोके अवघेचि तुटले ॥**
**ज्ञानविवेकें पावन जाले । बहुत लोक ॥ १२-३-३२.**
**पतितपावनाचे दास । तेहि पावन करिती जगास ।**
**ऐसी हे प्रचित मनास । बहुतांच्या आली ॥ १२-३-३३.**

तीच प्रतीति सद्गुरुकृपाप्रसादानें महाराष्ट्रास सारखी येत राहो, अशी प्रार्थना करून हा भाग पुरा करूं.

---

## आत्मज्ञानाचीं साधनें.

**आधीं अध्यात्मश्रवण । मग सद्गुरुपादसेवन ।**
**पुढें आत्मनिवेदन । सद्गुरुप्रसादें ॥ ६-२-४०.**

मागील प्रकरणांत आत्मज्ञानाचें लक्षण सांगण्यांत आलें आहे. तें आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याची साधनें कोणतीं याचें विवेचन या भागांत करावयाचें आहे. सामान्य व्यावहारिक ज्ञान प्राप्त करून घेण्यास देखील किती प्रयास पडतात याचा अनुभव आपण घेतच आहोंत. आत्मज्ञानाव्यतिरिक्त जें ज्ञान तें 'बहुधाज्ञान' होय. त्याचें निरूपण श्रीसमर्थांनीं द० ५×५ त केलें आहे. असल्या ह्या बहुधाज्ञानांपैकीं एखाद्या शाखेचे ज्ञान मिळविण्यास जर इतके परिश्रम करावे लागतात, तर त्याच्या कोटिगुणें अधिक ज्याचा महिमा आहे अशा आत्मज्ञानाची प्राप्ति होण्यास त्या मानानें परिश्रमहि अधिक करावे लागत असतील यांत शंका वाटत नाहीं. एकपरी असें वाटतें, परंतु दुसऱ्या पक्षीं असेंही मनांत येतें कीं, श्रीसद्गुरूनें पतकर घेतल्यावर व सच्छिष्यानें सद्गुरूवर सर्वस्वीं भार टाकल्यावर हें ज्ञान प्राप्त होण्यास काय ह्मणून विलंब लागावा ? श्री सद्गुरूनें अंगीकार केल्यापासून किती दिवसांत मोक्ष प्राप्त होतो

असा शिष्यांनीं प्रश्न विचारल्यावरून द०८×६ त त्याचें सद्गुरूंनीं उत्तर दिलें आहे कीं,

**लोहो परीसेसीं लागला। थेंबुटा सागरीं मिळाला।**
**गंगे सरिते संगम जाला। तत्क्षणीं ॥ ८-६-४३.**

तद्वत्

**प्रज्ञावंत आणि अनन्य। तयास नलगे येक क्षण ॥ ८-६-४६.**

यःकश्चित् व्यावहारिक ज्ञानाची प्राप्ति करून घेण्यास एखादें दुसरें तप खर्ची घालावें लागतें, तर मग आत्मज्ञानाची जोड करून घेण्यास वास्तविक किती तरी जन्म घेतले पाहिजेत; परंतु सद्गुरु तर सांगत आहेत कीं आत्मज्ञान होण्यास कांहीं वेळ नको, एका क्षणांत त्याची प्राप्ति होते. ह्या ह्मणण्यांत क्षणभर विरोध वाटतो, पण खरोखर त्यांत विरोध आहे काय ? सद्गुरु तरी काय सांगत आहेत ? जो प्रज्ञावंत शिष्य आहे आणि जो सद्गुरुचरणीं अनन्य आहे त्याला क्षणाचाहि अवकाश नको, पण प्रज्ञावंत आणि अनन्य होण्यासच अगोदर किती तरी सायास पडत असतील ? आपला सद्गुरूवर पूर्ण भरंसा आहे असें ह्मणणारे पुष्कळ असतात, पण सद्गुरु कोठें तें खरें मानतात ? ते जाणत असतात कीं

**देवावेगळें कोणी नाहीं। ऐसें बोलती सर्वेही।**
**परंतु त्यांची निष्ठा कांहीं। तैसीच नसे ॥ ४-८-१९.**

जी देवाची गति तीच गुरुची. तात्पर्य, कांहीं विशिष्ट परिस्थितींत आत्मज्ञान होण्यास जरी अवकाश लागत नसला तरी ती परिस्थिति प्राप्त होण्यासच बराच अवधि लागतो.

**जेचि क्षणीं अनुग्रह केला। तेचि क्षणीं मोक्ष जाला ॥**

हें खरें आहे, पण अनुग्रह होण्यास आधींच किती तरी तयारी केली पाहिजे. अनुग्रह कांहीं वाटेवर पडला नाहीं व जर कदाचित् तो वाटेवर कोठें विकत मिळत असला तर त्याची किंमतहि फारशी कोणीं करूं नये.

**ऐसे गुरु अडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे ॥ ५-२-२१.**

अशा गुरूंच्या नादीं लागून मोक्ष ह्मणजे कपाळमोक्षच प्राप्त व्हावयाचा ? अशा गुरूंनीं

**मंत्र यंत्र उपदेसिले । नेणते प्राणी ते गोविले ।**
**जैसें झाकून मारिलें । दुःखणाईत ॥ १०-८-१७.**

सारांश, कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी आत्मज्ञान सहज प्राप्त होण्यासारखें नाहीं. तें प्राप्त करून घेण्याचें कांहीं मार्ग आहेत. त्या मार्गांचा आपण क्रमशः विचार करूं.

### सद्गुरुभजन

ही पहिली आवश्यक गोष्ट होय. सद्गुरूवांचून ज्ञान नाहीं हा सिद्धान्त ठरलेला आहे. सद्गुरु अंगीकार करितील तेव्हां करोत पण आपण मात्र त्यांचें भजन, पूजन, स्तवन, चिंतन केल्यावांचून राहूं नये. कारण परमार्थाचा आरंभच येथून होत आहे. सद्गुरुभजनाला आपण लागलों ह्मणजे आपल्या ठिकाणीं परमार्थबुद्धीचा जन्म झाला ह्मणून समजावें.

**परमार्थाचें जन्मस्थान । तेंचि सद्गुरूचें भजन ॥ ७-१०-३८.**

आपलें कर्तव्य इतकेंच आहे. आपण अनन्य भावानें सद्गुरूचें भजन करावें, त्यांना योग्य वाटेल त्या वेळीं ते आपला अंगीकार करितील, त्याची चिंता आपणास नको. आपला अधिकार पाहून आपल्यावर अनुग्रह करणें किंवा न करणें हें सद्गुरूचें पाहणें आहे. आपण आपलें कर्तव्य करीत असलों ह्मणजे सद्गुरु आपलें कर्तव्य विसरतील अशी शंका सुद्धां घ्यावयास नको. श्रीसमर्थ सांगतात,

**शरणागतांची वाहे चिंता । तो येक सद्गुरु दाता ।**
**जैसें बाळक वाढवी माता । नाना येत्नेंकरूनी ॥ ७-१०-४०.**

बाळपणीं सर्वस्वीं मातेवर अवलंबून असणाऱ्या मुलाला, आपली आई आपलें संगोपन करील किंवा नाहीं अशी काळजी बाळगावयास नको असते, आणि तें मूल तशी काळजी बाळगित हि पण नाहीं. आईनें जेवावयास घातलें तर तें जेवणार व तिनें प्यावयास दिलें तर तें पिणार, इतक्या पूर्ण रीतीनें मातेवर विश्वसून असणाऱ्या बालकाला स्वतःच्या संगोपनासाठीं आईची निराळी विनवणी करावी लागत नाहीं. हाच संबंध गुरुशिष्यांमध्यें आहे. सद्गुरु आपणांस भवसागराच्या पलिकडे नेतील किंवा नाहीं अशी चिंता करणें हें शिष्याचें कामच नव्हे. सद्गुरूला शिष्य अनन्यभा-

वानें शरण गेला ह्मणजे त्याचें काम संपलें; पुढचा सर्व पतकर गुरुमातेला घेणें भाग आहे.

**साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली ॥**
**सुगम पंथें नेऊन घाली । जेथील तेथें ॥** ४-६-२४.

एवढेंच साधकाचें काम आहे. साधकानें सद्गुरूला सद्भावानें शरण जावें ह्मणजे झालें.

**ह्मणोन सद्गुरूचें भजन । जयासि घडे तोचि धन्य ।**
**सद्गुरुविण समाधान । आणीक नाहीं ॥** ७-१०-८.

सद्गुरु सांगतात,

**सद्गुरुभजनापरतें कांहीं । मोक्षदायेक दुसरें नाहीं ॥**

या वचनावर अविश्वास धरण्याइतका पतित कोण असणार ? तरी पण या वचनाला आधार काय म्हणून कोणाचा आग्रह असलाच तर त्यासाठीं ते म्हणतात कीं,

**जयास न मने तेहीं । अवलोकावी गुरुगीता ॥** ७-१०-४२.

मुमुक्षूनें पहिली गोष्ट करावयाची ती ही होय. सद्गुरुभजन हें तर परमार्थाचें जन्मस्थान आहेच पण सद्गुरुवचनप्रतिपाळण हें हि सच्छिष्याला आवश्यक होय.

**गुरूचें वचनप्रतिपाळण। हें मुख्य परमार्थाचें लक्षण॥** ६-७-१०.

ज्यानें आपला सर्वस्वीं भार घेतलेला असतो त्याच्या आज्ञेंत आपण राहिलें पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. असें जो न करील तो मोक्षप्राप्तीला मुळींच योग्य झाला नाहीं असें समजावें.

**सद्गुरुवचन हृदईं धरी । तोचि मोक्षाचा अधिकारी॥** ८-८-५७.

मग असें हें सद्गुरुवचन कोणतें आहे बरें, कीं जें आपण अखंड चित्तांत वागवून त्याचें निरंतर श्रवण मनन केलें पाहिजे ?

**सोहं आत्मा स्वानंदघन । अजन्मा तो तूंचि जाण ।**
**हेंचि साधूचें वचन । सदृढ धरावें ॥** ८-८-३३.

अहं ब्रह्मास्मि । तत्त्वमसि । इत्यादि महावाक्यांचा जो अर्थ तोच सद्गुरुचा भावार्थ होय आणि ह्मणून आपणास त्याचा विसर कधींहि पडतां कामा

नये. अखंड चिंतन करावयाचें तें याच भावार्थीचें. संत, साधु सज्जन, यांचे-पासून ऐकावयाचें तें हेंच व तद्रूप होईपर्यंत सारखा निदिध्यास लावून घ्याव-याचा तो ह्याचाच.

**माहावाक्याचें अंतर । तूंचि ब्रह्म निरंतर ।**
**ऐसिया वचनाचा विसर । पडोंचि नये ॥** ८-८-३४.

आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेण्यासाठीं दुसरें आवश्यक साधन ह्मणजे

**सत्संग**

हें होय. सत्संग ह्मणजे सद्गुरूचा किंवा साधुजनांचा सहवास असा अर्थ करा-वा. प्रत्यक्ष सद्गुरूचा सहवास घडेल तर मग त्यापरतें दुसरें भाग्य नाहीं, परंतु सद्गुरूच्या अभावीं संत, साधु, सज्जन यांच्या संगतींत मुमुक्षूनें काळ घालावा. संत, साधु कोणास ह्मणावयाचें?

**जो जाणेल भगवंत । तया नाव बोलिजे संत ।**
**जो शाश्वत आणी अशाश्वत । निवाडा करी ॥** ६-१-१६.
**चळेना ढळेना देव । ऐसा ज्याचा अंतर्भाव ।**
**तोचि जाणिजे माहानुभाव । संत साधु ॥** ६-१-१७.
**जो जनामधें वागे । परि जनावेगळी गोष्टी सांगे ।**
**ज्याचे अंतरीं ज्ञान जागे । तोचि साधु ॥** ६-१-१८.

याशिवाय द० ८×९ यांत साधूचीं एकंदर लक्षणें दिलीं आहेत. साधूच्या ठिकाणीं काम, क्रोध, मद, मत्सर, दंभ, लोभ, शोक, मोह, भय, खेद इत्या-दि विकार नसतात. साधु निष्प्रपंच असतात. "नैराशता" ही साधूची मुख्य ओळखण होय. साधु वीतरागी आणि उपाधिरहित असतात. कसें होईल, काय होईल, अशी त्यांना चिंता नसते. त्यांचें वचन मृदु असतें. मानापमाना-कडे ते पाहात नाहींत. ते परम दक्ष असतात. परमार्थाचे ते कैवारी असतात.

**सकळ धर्मामधें धर्म । स्वरूपीं राहाणें हा स्वधर्म ॥**

असें असल्यामुळें

**सदा स्वरूपानुसंधान । हें मुख्य साधूचें लक्षण ॥**

समजावें. अशा सत्पुरुषांचा सहवास घडण्यास ईश्वराची केवढी तरी कृपा पाहिजे.

**पूर्वजांच्या पुण्य कोटी । संग्रह असिल्या गांठीं ।**
**तरीच ऐसीयाची भेटी । होये जनासी ॥** १४-७-१७.

अशांच्या संगतीवांचून इतरत्र चित्ताला शांति कोठें मिळणार आहे? साधुसमागमावांचून अन्यत्र समाधान कोठें आढळणार आहे?

**जें त्रैलोकीं नाहीं दान । तें करिती संतसज्जन ॥** १-५-२४.

जी वस्तु ज्याच्यापाशीं नाहीं, त्याच्यापाशीं ती कशी मिळावी? समाधान मिळण्याचें ठिकाण सत्पुरुष; त्यांच्यापाशीं शोध न घेतां सर्व जगभर विचारणा केली तरी आपणांस पाहिजे आहे ती वस्तु कशी प्राप्त व्हावी? हा सामान्य न्याय आहे.

**रायाचे सन्निध होतां । सहजचि लाभे श्रीमंतता ।**
**तैसा हा सत्संग धरितां । सद्वस्तु लाभे ॥** ६-९-२०.

त्यासाठीं मग कांहीं निराळे परिश्रम करावे लागत नाहींत. सत्समागमाचा महिमा तो हाच आहे. पुष्कळ वेदाभ्यास करूनहि प्राप्त होईल किंवा न होईल याची वानवाच असते, अशा वस्तूची प्राप्ति सत्समागमानें होते. कित्येक वर्षें शास्त्राभ्यास करून जें सार काढावयाचें तें सत्समागमामध्यें अनायासें मिळतें.

**न करितां घित्पत्तीचा श्रम । सकळ शास्त्रार्थ होये सुगम ॥**
**सत्समागमाचें वर्म । तें हें ऐसें असे ॥** ७-१-३८.

अशा प्रकारचें सत्संगाचें महत्त्व असल्याकारणानें

**सत्संगापरतें साधन । आणीक नाहीं ॥** ७-१०-३६.

असें जें ह्मटलें आहे तें अगदीं यथार्थ वाटतें.

**ह्मणौन संतसंगेंचि जावें । सत्शास्त्रचि श्रवण करावें ॥**
**उत्तम गुणास अभ्यासावें । नाना प्रयत्नें ॥** १७-१०-३०.

सत्संगानंतरच्या पायऱ्या

**श्रवण—मनन—निदिध्यास**

इत्यादि होत. आधीं श्रवण, मग मनन, मग निदिध्यास अशा ह्या एकाहून एक वरचढ पायऱ्या आहेत. पहिली पायरी श्रवणाची. ऐहिक असो किंवा पारलौकिक असो, कोणतीही सद्गति प्राप्त करून घेण्यास श्रवण हें पाहिजे.

**प्रवृत्ती अथवा निवृत्ती । श्रवणेंविण न घडे प्राप्ती ॥** ७-८-१८.

ऐहिक सद्गति कशी असते ती जर कधींच ऐकिली नाहीं तर तिच्या साठीं मनुष्याच्या किंवा राष्ट्राच्या हातून प्रयत्न कसा व्हावा?

**ऐकिल्याविण कळलें। सिकविल्याविण शाहाणपण आलें।**
**देखिलें ना ऐकिलें। भूमंडळीं॥** १८-१०-६.

इतिहासाची आवश्यकता भासते ती एवढ्यासाठींच होय. प्रवृत्तिमार्गाला जसे इतिहासग्रन्थ तसे निवृत्तिमार्गाला अद्वैतग्रन्थ होत. श्रवणांतच वाचनाच समावेश करून घेतला पाहिजे. ज्याला ऐहिक उन्नतीचा मार्ग शोधावयाचा असेल त्यानें स्वदेशाचा व परदेशाचा इतिहास पाहावा, परंतु

**जेणें सांडिला इहलोक। जो परलोकीचा साधक।**
**तेणें पाहावा विवेक। अद्वैत शास्त्रीं॥** ७-९-७.

परमार्थमार्गाला अद्वैतग्रन्थापेक्षां दुसऱ्या कोणत्याच ग्रन्थाची मातब्बरी नाहीं. अद्वैतग्रन्थ ह्मणजे

**परमार्थास तत्वता। तारूंच कीं॥** ७-९-२८.

अशा अद्वैतग्रन्थांचें श्रवण किंवा वाचन आणि मनन वारंवार किंबहुना निरंतर घडलें पाहिजे. एकवार जेवल्यानें जर पुन्हां जेवावें लागलें नसतें तर एकवार श्रवण केल्यानेंही भागलें असतें. परंतु जसें एकदां जेवून चालत नाहीं, तसें एकदां श्रवण करूनहि वस्तु साधत नाहीं.

**सेविलेंच सेवावें अन्न। घेतलेंचि घ्यावें जीवन।**
**तैसें श्रवणमनन। केलेंचि करावें॥** ७-८-४७.

ज्ञान मलिन झालें ह्मणजे त्याची उजळणी करणें भाग आहे. परंतु ज्ञान मलिन झाल्यावर त्याची उजळणी करण्यापेक्षां तें ज्ञान मलिनच न होऊं देणें चांगलें.

**याकारणें श्रवण। अखंड असावें॥** ७-५-४२.

या कामीं मुमुक्षूनें आळस करतां कामा नये. आळसानें प्रपंचांत देखील दैना होते, मग परमार्थमार्गाला आळसाचा विटाळ कसा सहन होईल? ज्याच्या ठिकाणीं आळस वास करीत असेल त्यानें परमार्थाचें नांव सुद्धां काढूं नये. आळस ह्मणजे परमार्थाची शुद्ध बुडवणूक होय.

**आळसाचें संरक्षण। परमार्थाची बुडवण॥** ७-८-४९.

ही गोष्ट अगदीं निश्चित आहे; असो.

श्रवणासारखें दुसरें साधन नाहीं. परमार्थाचें साधन कोणतें असाच प्रत्यक्ष प्रश्न श्रीसमर्थांना शिष्यांनीं केला असतां त्यांनीं इतर साधनें न सांगतां हेंच साधन सांगितलें आहे.

ऐका परमार्थाचें साधन । जेथें होये समाधान ।
तें तूं जाण गा श्रवण । निश्चयेंसीं ॥ ७-८-१.

द० ७X८ त याच साधनाचें महत्त्व श्रीसमर्थांनीं वर्णिलें आहे. इतर आवश्यक गोष्टी त्यांनीं पुष्कळ सांगितल्या आहेत पण साधन ह्मणून एवढेंच निर्दिष्ट केलें आहे.

परब्रह्मायेवढें थोर नाहीं । श्रवणापरतें साधन नाहीं ।
कळल्याविण कांहींच नाहीं । समाधान ॥ २०-२-९.

ह्मणून

अध्यात्मश्रवण करीत जावें । ह्मणिजे सकळ कांहीं फावे ।
नाना प्रकारीचे गोवे । तुटोनी जाती ॥ २०-९-१८.

श्रवणाचें महत्त्व इतकें आहे खरें, परंतु मनन किंवा विवरण झाल्यावांचून केलेलें श्रवण सारें व्यर्थ होय. विवरणाची आवश्यकता किती आहे ती दर्शविण्यासाठीं द० १८X५ त श्रीसमर्थांनीं दोन तीन दृष्टान्त दिले आहेत. पुष्कळ ऐकलें आणि वाचलें पण मनांत कांहींच सांठवलें नाहीं तर त्या श्रवणाचा किंवा वाचनाचा काय उपयोग ?

धान्य उदंड मोजिलें । परी त्या मापें नाहीं भक्षिलें ।
विवरल्याविण तैसें जालें । प्राणिमात्रांसी ॥ १८-५-१.
पसेवरी वैरण घातलें । तांतडीनें जातें वोडिलें ।
तेणें पीठ बारीक आलें । हें तों घडेना ॥ १८-५-८.
घांसामागें घांस घातला । आवकाश नाहीं चावायाला ।
अवघा बोकणा भरिला । पुढें कैसें ॥ १८-५-९.

पुढें काय? तो बोकणा कांहीं खालीं उतरावयाचा नाहीं. यासाठीं, जें श्रवण केलेलें असतें तें मनांत उतरावें अशी इच्छा असेल तर मनन केलें पाहिजे. मनन कसें करावयाचें ? जानवें गुतलें ह्मणजे तें जसें उकलावयाचें तद्वत् मनन करावें.

**सूत गुंतलें तें उकलावें । तैसें मन उगवावें ।**
**मानत मानत घालावें । मुळाकडे ॥** २०-९-१९.

जें श्रवण केलेलें असतें त्याचें अशा रीतीनें मनन केलें पाहिजे. पूर्वसंचिताबांचून मनन करण्याची बुद्धि व्हावयाची नाहीं. मनन करण्यांत गेलेला काळ परमेश्वरासन्निध घालविल्यासारखा आहे; कारण

**मननसीळ लोकांपासीं । अखंड देव अहिर्निशीं ।**
**पाहातां त्यांच्या पूर्वसंचितासी । जोडा नाहीं ॥** १७-१-२२.

श्रवण सर्वांत श्रेष्ठ साधन आहे, परंतु श्रवणाहूनहि मननाची योग्यता अधिक आहे.

**सकळांमधें विशेष श्रवण । श्रवणाहून थोर मनन ।**
**मननें होय समाधान । बहुत जनाचें ॥** १९-२-२२.

ज्या वस्तूचें श्रवण आणि मनन करावयाचें आहे ती वस्तु दृष्टीस पडण्यासारखी नाहींच आहे, ती केवळ जाणावयाची आहे. ह्मणून

**जें दृष्टीस न पडे ठावें । तें ऐकोन जाणावें ।**
**श्रवणमननें पडे ठावें । सकळ कांहीं ॥** १७-१०-१३.

ज्याचें श्रवणमनन करावयाचें त्याचा आपणांस सारखा निदिध्यास लागला पाहिजे. श्रवणमनन होऊन निदिध्यास लागल्यावर प्रतीति आल्यावांचून राहणार नाहीं. श्रवणमनननिदिध्यास यांपेक्षां इतर साधनांची अपेक्षा नाहीं.

**श्रवण मनन निजध्यास । प्रचितीनें बाणती विश्वास ।**
**रोकडा साक्षात्कार सायास । करणेंचि नलगे ॥** १०-९-३०.
**श्रवणापरीस मनन सार । मननें कळे सारासार ।**
**निजध्यासें साक्षात्कार । निसंग वस्तु ॥** ११-१-४१.

आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याचे खरोखर एवढेच मार्ग आहेत. प्रथम सद्गुरुभजन करावें, नंतर सत्संग धरावा व नंतर श्रवणमनन होऊन निजध्यास लावून घ्यावा. यापरीस दुसरीं निराळीं साधनें नाहींत, परंतु श्रवणमनन होत असतां दुसऱ्या दोन तीन गोष्टींची अपेक्षा असते. पैकीं पहिली गोष्ट ह्मणजे

**अभ्यास.**

ही होय. नित्यनेम केव्हांहि टळूं देऊं नये. अपरिहार्य कारणानें नित्यनेम राहिल्यास हरिस्मरण करावें. साधकानें आचार पाळल्यावांचून राहूं नये.

**आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार ।**
**आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥** १७-१०-२५.

द० ११×३ व द० १२×९ त्यांत मुमुक्षूनें सामान्यपणें कसें वागावें हें सांगितलें आहे, त्या शिकवणीचा सारांश येणेंप्रमाणें:— ( १ ) प्रातःकाळीं उठत जावें । प्रातःस्मरामि करावें । नित्य नेमें स्मरावें । पाठांतर ॥ ( २ ) मग दिशेकडे जावें । जे कोणासीच नव्हे ठावें । शौच्य आचमन करावें । निर्मळ जळें ॥ ( ३ ) मुखमार्जन प्रातःस्नान । संध्या तर्पण देवतार्चन । पुढें वैश्यदेव उपासन । येथासांग ॥ ( ४ ) कांहीं फळाहार घ्यावा । मग संसार धंदा करावा । सुशब्दें राजी राखावा । सकळ लोक ॥ ( ५ ) नंतर भोजन करावें. ( ६ ) पुढें भोजन जालियावरी । कांहीं वाची चर्चा करी । येकांतीं जाऊन विवरी । नाना ग्रन्थ ॥ ( ७ ) रिकामा असा एक क्षण देखील जाऊं देऊं नये. ( ८ ) जें आहे तें सर्व देवाचें आहे अशी बुद्धि धरून वागावें. ( ९ ) सावधानता असावी । नीतिमर्यादा राखावी । जनास मानेऐसी करावी । क्रियासिद्धि ॥ ( १० ) जैसें बोलणें बोलावें । तैसेंचि चालणें चालावें । मग महंतलीळा स्वभावें । आंगीं बाणे ॥ प्रपंची मनुष्यासाठींच हे दोन समास लिहिलेले दिसतात, तदनुरूप वागण्याचा प्रपंची मनुष्यानें प्रयत्न करावा. हे दहा नियम म्हणजे त्यांत सर्व कांहीं आलें असें मात्र नव्हे. प्रपंची मनुष्याला सामान्यपणें सांगावयाचें म्हणजे त्यांनें

**अवगुण अवघेचि सांडावे । उत्तम गुण अभ्यासावे ॥** १८-२-१३

जो निस्पृह आहे, ज्यानें प्रपंचाचा त्याग केला आहे अशा सच्छिष्यासाठीं द० १४ चा समास १ लिहिलेला आहे. त्या समासाच्या ८० ओव्या आहेत. त्यांचें सार काढावयाचें म्हणजे त्याच सर्व येथें उतरून घेतल्या पाहिजेत, कारण त्या सारभूतच आहेत. तरी वाचकांनीं या ठिकाणीं तो समास कृपा करून मुळावरून वाचावा.

प्रपंची शिष्याला आणि निस्पृह शिष्याला येणेंप्रमाणें श्रीसमर्थांनीं अभ्यास करावयास सांगितला आहे. अशा प्रकारचा अभ्यास करण्यास सच्छिष्यानें कंटाळा करूं नये.

**भजन साधन अभ्यास । येणें पाविजे परलोकास ।**
**दास ह्मणे हा विश्वास । धरिला पाहिजे ॥** १६-१०-३१.

अभ्यास किंवा प्रयत्न ह्मटला म्हणजे तेथें दुश्चित्तपणा किंवा आळस यांचें नुसतें दर्शन सुद्धां खपावयाचें नाहीं. दुच्छित्तपणा नसावा याचा अर्थ सावधानता असावी. आपणांस जें प्राप्त करून घ्यावयाचें असेल, त्याची कल्पना अखंड चित्तांत वागविणें याचें नांव सावधानता. इष्ट कार्याविषयीं अशी सावधानता नसली तर मनुष्याच्या हातून कांहींच कार्य व्हावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें सुचित अंतःकरण असूनहि मनुष्य जर आपला काळ आळसांतच घालवील तर अशाहि मनुष्याचें जिणें व्यर्थच होय.· दुश्चित्तपणा आणि आळस यांचे अनिष्ट परिणाम काय होतात याची आपल्यास कल्पना नाहीं असें थोडेंच आहे, तरी पण तत्संबंधीं श्रीसमर्थांनीं केलेलें वर्णन कोणास बोधप्रद होणार नाहीं ? निद्रा, आळस व दुश्चित्तपणा हीं मूर्खाचीं लक्षणें होत.

**क्षुधा लागतांच जेविला । जेऊन उठतां आळस आला ।**
**आळस येतां निजेला । सावकाश ॥** ८–६–३८.
**निजोन उठतांच दुश्चीत । कदा नाहीं सावचित ।**
**तेथें कैचें आत्महित । निरूपणीं ॥** ८-६-३९.

तरी असें नसावें.

**येकाग्र करूनियां मन । बळेंचि धरावें साधन ।**
**येत्नीं आळसाचें दर्शन । होऊंच नये ॥** १८-३-१२.

असो. दुसरी गोष्ट म्हणजे श्रवण मनन चालू असतां

## विषयाबद्दल वैराग्य

उपजलें पाहिजे. वैराग्यावांचून निदिध्यास लागावयाचा नाहीं व निदिध्यास नाहीं तर ज्ञान नाहीं.

**विषईं वैराग्य उपजलें । तयासीच पूर्ण ज्ञान जालें ॥** ५-६-६१.

इतरांस नाहीं. विषयाबद्दल तिरस्कार वाटून त्याचा त्याग घडला पाहिजे. विषयाचा ध्यास लागलेलें मन परब्रह्मस्वरूपाकडे कसें वळावें ? मन एकदेशी आहे, त्याला कोणता तरी एक व्यासंग पाहिजे. विषयाविषयीं आसक्ति ज्या मानानें कमी होत जाईल त्या मानानें मनाचा ओढा ईश्वरस्वरूपाकडे लागेल, आणि ज्या वेळीं विषयासंबंधानें पूर्ण वैराग्य उत्पन्न होईल त्या वेळीं साधकाला पूर्ण आत्मज्ञान होईल. नाहींपेक्षां विषयासक्ति यत्किंचित्‌हि कमी न होतां कितीहि ज्ञानाच्या गोष्टी बडबडतां आल्या तरी त्या व्यर्थ होत. मुखानें शब्दज्ञान बड-

असणारा पण मनानें पूर्ण विषयासक्त, अशा मनुष्याचें वर्णन किती तरी तिरस्कारयुक्त वचनांनीं श्रीसमर्थांनीं केलें आहे. (द. ५-३-५७ ते ६९) विषयांमध्यें मग्न होऊन राहणें ह्मणजेच परमार्थमार्गांतील झोंप होय. विषयाबद्दल पूर्ण वैराग्य उत्पन्न होणें याचें नांव जागृति. या ठिकाणीं एक अशी शंका उत्पन्न होते कीं विषयांचा त्याग करावयाचा याचा अर्थ, काय जेवणखाण वगैरे सर्व सोडावयाचें? कारण जेवणें, खाणें, इत्यादि हे सर्व विषयच आहेत. विषयत्यागाचा असा अर्थ नाहीं. कारण जोंवर देह आहे तोंवर जेवणखाण इत्यादि विषय कोणीं सोडले आहेत?

**देह चालतां विषय त्यागी। ऐसा कोण आहे जगीं॥** १२-७-६.

कोणी नाहीं. प्रपंची आहेत तेवढेच जेवतात व परमार्थी आहेत ते उपवास करितात असें थोडेंच आहे!

**प्रपंची खाती जेविती। परमार्थी काय उपवास करिती॥** १२-७-५.

नाहीं. मग विषयत्यागावांचून ज्ञान नाहीं याचा अर्थ काय? परमार्थाला विषयत्याग घडला पाहिजे आणि देह आहे तोंवर विषयत्याग तर कांहीं होनाहीं, मग हें कोडें कसें उकलावयाचें? श्रीसद्गुरु विषयत्यागाचें लक्षण येणेंप्रमाणें सांगतातः—

**सबळ विषय त्यागणें। शुद्ध कार्याकारण घेणें।**
**विषयत्यागाचीं लक्षणें। वोळखा ऐसीं॥** १२-७-२७.

निरर्थक विषयांचा त्याग करून प्राणरक्षणार्थ अत्यन्त आवश्यक तेवढ्याच विषयांचें सेवन करणें, याचें नांव विषयत्याग. विषयाबद्दल वैराग्य उत्पन्न झालें ह्मणजे विषयत्याग घडतो; आणि विषयत्याग घडला तरच परमार्थमार्ग लागण्याचा संभव आहे. असा विषयत्याग करणें कष्टमय वाटेल, पण त्याला इलाज नाहीं.

**मागें ज्ञानी होऊन गेले। तेहिं बहुत कष्ट केले।**
**तरी मग विख्यात जाले। भूमंडळीं॥** १२-७-१०.

श्रवणमनन यथासांग घडण्यास तिसरी आवश्यक गोष्ट ह्मणजे

## विचार किंवा विवेक

ही होय. या विचाराचें महत्त्व दासबोधांत पुष्कळ ठिकाणीं दर्शविलें आहे. किंबहुना मला असेंहि वाटतें कीं ब्रह्म, माया किंवा तदर्थी शब्द खेरीज

करून विचार आणि साक्षेप किंवा तदर्थी शब्द हे या ग्रन्थांत जितक्या वेळां आले आहेत तितक्या वेळां दुसऱ्या कोणत्याच शब्दांचा उपयोग करावा लागला नसेल. तें कांहीं असो, माझें म्हणणें इतकेंच आहे कीं श्रीसद्गुरूंनीं आपल्या बोधांत विचार आणि प्रयत्न यांवर फार भर दिला आहे. ऐहिक किंवा पारलौकिक उन्नति प्राप्त करून घेण्यासाठीं विचारावांचून केलेले प्रयत्न सारे व्यर्थ होत.

**विवेक पाहिल्याविण । जो जो उपाव तो तो सीण ॥** ८-७-६५.

ह्या ह्मणण्याचा चांगला बोध होण्यास उदाहरण पाहिजे असल्यास द० १२×४ त तें दिलें आहे. विषयाबद्दल वैराग्य उपजलें तरच ज्ञान होण्याचा संभव आहे हें वर ह्मटलेंच आहे, पण तेंच वैराग्य विवेकयुक्त नसेल तर व्यर्थ होय. विवेकयुक्त वैराग्य पाहिजे. विवेक आणि वैराग्य अशीं दोन्ही पाहिजेत, नुसतें वैराग्य नको. नाहींपेक्षां पुष्कळांचें असें होतें कीं संसारांत त्यांना कांहीं त्रास होतो व तेणेंकरून संसाराविषयीं त्यांचें मन कंटाळून ते चालते होतात, पण

**विवेकेंविण वैराग्य केलें । तरी अविवेकें अनर्थी घातलें ।**
**अवघें वेर्थचि गेलें । दोहींकडे ॥**१२-४-६.

विवेकहीन वैराग्यापासून धड प्रपंचहि नाहीं व परमार्थहि नाहीं.

**ना प्रपंच ना परमार्थ । अवघें जिणेंचि जालें वेर्थ ।**
**अविवेकें अनर्थ । ऐसा केला ॥** १२-४-७.

उलट पक्षीं, विवेक आहे पण वैराग्य नाहीं तर तेंही निष्फळ होय. प्रपंचकूपांत इतरांप्रमाणेंच डुंबत राहून ज्ञानाच्या गोष्टी सांगावयाच्या, ह्मणजे कारागृहांत अडकलेल्यानें पुरुषार्थाच्या बाता मारण्यासारखेंच होय. तात्पर्य, नुसतें वैराग्य नको व नुसता विवेकहि कामाचा नाहीं; तर विवेकवैराग्य पाहिजे.

**लोक मरमरों जाती । वडिलें गेलीं हे प्रचिती ।**
**जाणत जाणत निश्चिती । काये मानिलें ॥** ११-३-६.

असा प्रश्न स्वतःस विचारून आपलें मन जें उत्तर देईल तें आपल्या हृदयांत दृढ धरून मुमुक्षूनें संसाराविषयीं उदास झालें पाहिजे. वैराग्याच्या योगानें मुमुक्षु प्रपंचापासून सुटला व विवेकाच्या योगानें मीपणापासून सुटला म्हणजे मग आणखी काय पाहिजे आहे.

**विवेकें अंतरीं सुटला । वैराग्यें प्रपंच तुटला ।**
**अंतर्बाह्य मोकळा जाला । निःसंगयोगी ॥ १२-४-१२.**
**जैसें मुखें ज्ञान बोले । तैसीच सर्वे क्रिया चाले ।**
**दीक्षा देखोनी चाकित जाले । सुचिस्मंत ॥ १२-४-१३.**
**आस्था नाहीं त्रैलोक्याची । स्थिति बाणली वैराग्याची ।**
**येत्न विवेक धारणेची । सीमा नाहीं ॥१२-४-१४.**

याचें नांव विवेकवैराग्य. हें खुद्द श्रीसमर्थांचेंच वर्णन आहे कीं काय असें क्षणभर वाटतें. अशा सत्पुरुषांच्या नादीं सारें राष्ट्र लागावें यांत काय आश्चर्य आहे ? असो.

विवेक आणि विचार यांचा अर्थ सामान्यपणें आपण जो समजतों तोच केवळ नव्हे. विवेक आणि विचार हे समानार्थी शब्द आहेत खरे, परंतु पारिभाषिक भाषेंत विवेक ह्मणजे आत्मानात्मविवेक किंवा नित्यानित्यविवेक होय आणि विचार म्हणजे सारासारविचार होय. या दोहोंत फरक आहे. द० १३×१ यांत आत्मानात्मविवेक सांगितला आहे व द० १३×२ यांत सारासारविचार सांगितला आहे. आपल्या ठिकाणीं आत्मा कोणता व अनात्मा कोणता हें पाहणें याचें नांव आत्मनात्मविवेक व एकंदर ब्रह्मांडांत सार कोणतें व असार कोणतें हें पाहणें याचें नांव सारासारविचार.

**आत्मानात्मा विवेक पिंडीं । सारासार विचार ब्रह्मांडीं ॥१४-९-३.**

आत्मानात्मविवेकानें चंचलात्म्याचा निश्चय होतो. पिंडामध्यें देहधर्ता जो जीव आहे त्यालाच ईश्वर किंवा अर्धनारीनटेश्वर म्हणजे माया ह्मटलें आहे व आत्मानात्मविवेकाच्या योगानें

**अव्याकृत मूळप्रकृती । तेथें जाऊन बैसली वृत्ती ॥ १३-१-३०.**

अशी स्थिति होते व

**मुळीं जे राहिली वृत्ति । जाली पाहिजे निवृत्ती ॥ १३-२-४.**

म्हणून मग सारासारविचार करावयाचा. सारासारविचारानें असाराचा व चंचलाचा त्याग करतां करतां अखेरीस जें

**निश्चळ परब्रह्म उरलें । तेंचि सार ॥ १३-२-१८.**

सारांश, द. १३ समास १ व २ या दोन समासांचें मला तात्पर्य असें दिसतें कीं आत्मानात्मविवेकाच्या योगानें चंचळ आत्म्याचे स्वरूप लक्षांत येतें

व नंतर सारासारविचारानें परब्रह्मस्वरूपाचा निर्णय होतो. आत्मानात्मविवेकानें मायेचें स्वरूप कळतें व सारासारविचारानें ब्रह्माचें स्वरूप कळतें.

**आधीं आत्मानात्मा विवेक थोर । मग सारासार विचार ।**
**सारासार विचारें संव्हार । प्रकृतीचा ॥** १३–७–११.

हीं सर्व विचाराचीं कामें आहेत. अशा तऱ्हेचा विचार करीत आत्मज्ञानासाठीं जीं साधनें दिलीं आहेत त्यांचा मुमुक्षूनें अभ्यास करावा. केवळ विचाराच्या योगानें नरजन्माची सफलता होणें शक्य आहे. विचाराच्या योगानें

**याचि जन्में येणेंचि काळें । संसारीं होईजे निराळें ।**
**मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥** ६–९–२९.

ही गोष्ट श्रीसद्गुरुसमर्थ प्रतिज्ञेवर सांगत आहेत, तेव्हां ह्या ह्मणण्यावर अश्रद्धपणें कोणी शंका घेऊ शकेल काय ?

**ये गोष्टीस करी अनुमान । तो सिद्धचि पावेल पतन ।**
**मिथ्या वदे त्यास आण । उपासनेची ॥** ६-९-३०.

आणखी काय पाहिजे ? सद्गुरु ह्मणतात,

**हें येथार्थचि आहे बोलणें । विवेकें सीघ्रचि मुक्त होणें ।**
**असोनि कांहींच नसणें । जनामधें ॥** ६-९-३१.

विवेकाच्या योगानें तत्काळ मुक्त व्हावें ! तें कसें व्हावें आणि विवेक तरी कोणता करावा ? विवेक हाच करावा कीं,

**देवपद आहे निर्गुण । देवपदीं अनन्यपण ।**
**हाचि अर्थ पाहातां पूर्ण । समाधान बाणे ॥** ६–९–३२.

देवपद निर्गुण आहे व तेंच आपण आहोंत हे शब्द समजतात पण यापेक्षां जास्त कांहीं बोध होत नाहीं. बोध कसा व्हावा,

**देहींच विदेह होणें । करून कांहींच न करणें ।**
**जीवन्मुक्तांचीं लक्षणें । जीवन्मुक्त जाणे ॥** ६–९–३३.

जो जीवन्मुक्त आहे त्याला हें समजावयाचें, कारण हीं त्याचीं लक्षणें आहेत, तीं इतरांस कशीं पटावींत ? आपल्या सारख्याला

**येरवीं हें खरें न वटे । अनुमानेंचि संदेह वाटे ।**

परंतु

**संदेहाचें मूळ तुटे । सद्गुरुवचनें ॥** ६-९-३४.

अखेरीस सद्गुरुवचनावांचून कांहीं समजावयाचें नाहीं हेंच खरें ! असो.

विचाराचा किंवा विवेकाचा महिमा असा आहे. विवेक करून जें ज्ञान प्राप्त होईल त्याचा प्रत्यय घ्यावा. हा विवेक किंवा विचार एकांतांत करावा. परमार्थमार्गाला एकांताची आवश्यकता फार आहे. ही गोष्ट खरी आहे कीं,

**मिळतां प्रत्ययाचे संत । येकांतापरिस येकांत ॥** २०-७-२४.

तरी संतसमागमापासून जें ज्ञान मिळवावयाचें त्याचा विचार आपण एकांतांत केला पाहिजे. श्रीसद्गुरूंचें सांगणें तर इतकें निक्षून आहे कीं जो एकांत सेवन करणार नाहीं त्याला कांहींच कळावयाचें नाहीं.

**येकांतेंविण प्राणीयांतें । बुद्धि कैंची ॥** १९-६-२९.

ह्या एकांताचें महत्व सद्गुरूंनीं पुष्कळ ठिकाणीं वर्णिलें आहे.

**येकांतीं विवेक ठाई पडे । येकांतीं येत्न सांपडे ।**<br>**येकांतीं तर्के धावडे । ब्रह्मांडगोळीं ॥** १८-१०-४८.

हें समजण्यास फारसें कठिण नाहीं. आपली एखादी वस्तु हरवली असतां क्षणभर शांतपणें विचार केला तर आपणांस तिची आठवण होते, असा आपला अनुभव आहे.

**येकांतीं स्मरण करावें । चुकलें निधान पडे ठावें ॥** १८-१०-४९

मग गहन अशा परमार्थविचाराला एकांतावांचून चालावयाचें नाहीं यांत काय आश्चर्य आहे ?

**जयास येकांत मानला । आवघ्या आधीं कळे त्याला ॥** १८-१०-५०

यासाठीं

**येकांतीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ॥**<br>**येथून तेथवरी गोवा । कांहींच नाहीं ॥** १९-६-३०

याचा अनुभव घेऊन पाहण्याची बुद्धि महाराष्ट्रास होवो !

---

# सामान्य विचिकित्सा.



मला वाटतें अंतरीं त्वां वसावें।
तुझ्या दासबोधासि त्वां बोधवावें।
अपत्यापरी पाववी प्रेमग्रासा।
महाराजया श्रीगुरु रामदासा॥

—उद्धवस्वामी.

प्रस्तावनेच्या आरंभीं दासबोधांतर्गत श्रीसमर्थचारित्र देऊन पुढें तीन प्रकरणांत दासबोधाचें सार देण्याचा प्रयत्न केला आहे. या भागांत कांहीं अवांतर प्रश्नांचा विचार व्हावा, असा हेतु आहे. श्रीमत् दासबोध ग्रन्थाचें स्वरूप, त्याचें प्रयोजन, त्याचा विशेष, त्याचा रचनाकाल, त्यांत दर्शित होणारी तत्कालीन समाजस्थिति, त्याचें भावी कार्य, इत्यादि विषयांचें त्रोटक विवेचन या भागांत करावयाचें आहे.

तथापि, मला जें वाटतें तें सांगण्यापूर्वी खुद्द श्रीसमर्थ या ग्रन्थाविषयीं काय ह्मणतात तें आपण पाहूं. दासबोधाचा अगदीं पहिला समास ह्मणजे समर्थांनीं या ग्रन्थाची लिहिलेली प्रस्तावनाच होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्या प्रस्तावनेच्या आरंभीं नमन नाहीं. नमनाला आरंभ दुसऱ्या समासापासून करण्यांत आला आहे. कोणत्या विषयांचा ऊहापोह आपण आपल्या ग्रन्थांत केला आहे, त्यास कोणकोणत्या ग्रन्थांचा आधार आहे व त्याची फलश्रुति काय आहे इतक्या गोष्टी समर्थांनीं आपल्या प्रस्तावनेंत दिल्या आहेत. हा समास समर्थांनीं ग्रन्थारंभींच लिहिला असावा, कां ग्रन्थ संपूर्ण झाल्यावर लिहिला असावा कोण जाणे? या सबंध प्रस्तावनेंत राजकारण हा शब्द नाहीं. राजकारण हा शब्द प्रथम नवव्या दशकांत आला आहे. यासंबंधानें माझी एक कल्पना आहे, तिचा विचार पुढें करूं. या प्रस्तावनेंत नमूद केलेले विषय दासबोधांत कोठकोठें आले आहेत हें थोडासा प्रयत्न केला ह्मणजे वाचकांच्या लक्षांत येईल. आधारभूत ग्रन्थांची त्रोटक यादी देऊन श्रीसमर्थ सामान्यपणें सांगतात कीं,

भगवद्वाक्याविरहित नसे। बोलणें येथीचें॥

२८ व्या ओवीपासून समासाच्या अखेरपर्यंत फलश्रुति दिली आहे. त्यांत विशेष असें कीं

**शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ति ।।**

आहे, पण ती कोणाला ? त्याला वाचकहि तसाच पाहिजे. श्रीसमर्थ ह्मणतात,

**मायाजाळें दुश्चीत होये । तें निरूपणीं कामा नये ।**
**संसारिकां कळे काये । अर्थ येथींचा ।।** ७-१-४९.

संसारांत अहोरात्र गुरफटून गेलेल्या आह्मांला श्रीसमर्थांनीं दिलेल्या फलश्रुतीचा अनुभव आला नाहीं तर त्याचा दोष कोणाकडे ? सात्विक गुणांचा ऱ्हास करणारे वाटेल तसले धंदे पोटासाठीं करीत राहून फावल्या वेळीं दासबोध ग्रन्थ उघडणारा वाचक नको आहे श्रीसमर्थांना.

**वेवसाईं जो मळिण । त्यासी न कळे निरूपण ।**
**येथें पाहिजे सावधपण । अतिशयेंसीं ।।** ७-१-५०.

जसा मनुष्याचा व्यवसाय असतो तशी त्याची बुद्धि असते हें वचन काय खोटें आहे ? मग दासबोध ग्रन्थ वाचावा तरी कोणीं ?

**जयास जोडला परमार्थ । तेणें पाहावा हा ग्रन्थ ।**
**अर्थ शोधितां परमार्थ । निश्चयें बाणे ।।** ७-१-३०.

तथापि, आपल्या सारख्यालाहि श्रीसद्गुरु धीर देत आहेत.

**जयाचें चंचल हृदये । तेणें ग्रन्थ सोडूंचि नये ।।**

एकदां वाचून नाहीं समजला तर अनेकदां वाचावा; समजेपर्यंत वाचावा ह्मणजे समजेल.

**वीस दशक दोनीसे समास । साधकें पाहावे सावकास ।**
**विवरतां विशेषाविशेष । कळों लागे ।।** २०-१०-३२.

असा हा ग्रन्थ आहे. तो सर्वांनींच वाचावा. हळुहळु तो समजेल असें श्रीसमर्थांचें सांगणें आहे. हा प्रचीतीचा ग्रन्थ आहे. सर्व सत्पुरुषांच्या वचनांत सामर्थ्य असतें व लोकांचा त्यांवर विश्वास बसतो याचें एक मुख्य कारण असें असावें कीं, सत्पुरुष जें बोलतात तें त्यांच्या अनुभवाचें असतें, अनुमानाचें नसतें. अनुभवावांचून परमार्थाची शाब्दिक बडबड ह्मणजे कुत्र्याचें भोकणेंच होय.

**प्रचितीवीण जें बोलणें । तें अवघेंचि कंटाळवाणें ।**
**तोंड पसरून जैसें सुणें । रडोन गेलें ॥** ९-५-१५.

अशा बोलण्याकडे लक्ष न देणें बरें. अशा बोलण्यानें स्वतःचेंच समाधान होत नसतें तेव्हां तें दुसऱ्याचें कोठून होणार? यासाठीं

**जितुकें अनुमानाचें बोलणें । तितुकें वमनप्राये त्यागणें ।**
**निश्चयात्मक तेंचि बोलणें । प्रत्ययाचें ॥** ९-५-३८.

वैद्य तर मात्रेची खूप स्तुति करितो आणि मात्रा मात्र काहीं गुण करीत नाहीं, शब्दज्ञानी आत्मज्ञानाच्या गोष्टी तर खूप अवसानानें सांगतो, पण लोकांना तर कांहींच प्रत्यय येत नाहीं. असलें ज्ञान काय कामाचें?

**प्रचीतिविण जें ज्ञान । तो आवघाचि अनुमान ।**
**तेथें कैचें परत्रसाधन । प्राणियांसी ॥** १४-७-१८.

प्रपंच आणि परमार्थ या दोहींनाहि प्रचीतीचें महत्त्व फार आहे. (२०—३—२८) क्वचित् अनुमानानें प्रपंच धकेल पण परमार्थाला अनुमानाचा यत्किंचित् विटाळ खपावयाचा नाहीं. अनुमाननिरसन होऊन अनुभव येणें हें परमार्थाचें मुख्य वर्म आहे. ही गोष्ट श्रीसमर्थ किती तरी निश्चयपूर्वक सांगत आहेत. पहा

**येथें अनुमान राहिला । तरी परमार्थ केला तो वायां गेला ।**
**प्राणी संशई बुडाला । प्रचितीवीण ॥** १०-८-२४.
**हें परमार्थाचें वर्म । लटिकें बोलेल तो अधम ।**
**लटिकें मानील तो अधमोत्धम । येथार्थ जाणावा ॥** १०-८-२५.

अनुभव नसून केवळ अनुमानानें शिष्यपरंपरा चालविणें म्हणजे दुखणाईत मनुष्याला झांकून मारण्यासारखें आहे. या सांप्रदायाबद्दल श्रीसमर्थांनीं केलेली प्रतिज्ञा ऐका आणि तिचा अभिमान धरा अशी सांप्रदायिकांच्या चरणीं माझी प्रार्थना आहे. श्रीसद्गुरु समर्थ म्हणतात,

**माझे उपासनेचा वडिवार । ज्ञान सांगावें साचार ।**
**मिथ्या बोलतां उत्तर । प्रभूस लागे ॥** १०-८-२७.

श्रीमत् दासबोध ग्रन्थाच्या स्वरूपाविषयीं यापेक्षां जास्त विस्तार नको आहे असें वाटतें. श्रीसमर्थ सांगतात,

**साधें बोलणें सप्रचीत । तैसें माझें ॥** १४-१-२.

त्यांनीं दासबोध ग्रन्थाचें स्तवनहि केलें नाहीं. ते ह्मणतात, आपण स्तवन केलें आणि लोकांना तसा प्रत्यय आला नाहीं तर त्या स्तवनाचा काय उपयोग ? बरें, प्रत्यय आला तर मग स्तवनाचें प्रयोजनच नाहीं !

**ग्रन्थाचें करावें स्तवन । स्तवनाचें काये प्रयोजन ।**
**येथें प्रत्ययास कारण । प्रत्ययो पाहावा ॥** २०-१०-३३.

हा ग्रन्थ श्रीसमर्थांनीं कां लिहिला याचें विवेचन करण्यापूर्वीं ग्रन्थरचनेचा काळ कोणता होता हें आपण पाहूं व त्या वेळची समाजस्थिति कशी होती याचा आपण विचार करूं, ह्मणजे ग्रन्थाचें प्रयोजन सहजच आपल्या लक्षांत येणार आहे.

दासबोध ग्रन्थाचा रचनाकाळ ठरविणें कठीण नाहीं. तो ठरविण्यास खुद्द ग्रन्थांतच स्पष्ट आधार आहे.

**च्यारि सहस्र सातसें साठी । इतुकी कलयुगाची राहाटी ॥**

ही सहाव्या दशकाच्या चवथ्या समासांतील सातवी ओवी लिहिली त्या वेळीं कलियुगाचीं ४७६० वर्षें गत झालीं होती. गतकलि ४७६० म्हणजे शके १५८१ होय. सहावा दशक लिहिला तेव्हां १५८१ शक चालू होता. अफझूलखानाचा वध १५८१ च्या मार्गशीर्षांत झाला. त्या प्रसंगाला अनुलक्षून द. १८×६ हा समास सांगितला अशी कथा आहे व ती खरी असावी असें, तो समास वारंवार वाचून, वाटतें. तेव्हां १५८१ च्या मार्गशीर्षाचें सुमारास १८ वा दशक चालू होता. सारांश, द. ६×४ त शके १५८१ चा स्पष्ट उल्लेख आहे, व द. १८×६ हा समास अफझूलखानाच्या वधानंतर महाराज श्रीसमर्थांना भेटावयास आले त्या प्रसगीं सांगितला, तर एकंदर दासबोध ग्रन्थ शके १५८१ या एका वर्षांतच लिहिला गेला असें आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून अनुमान काढण्यास हरकत नाहीं.

तथापि दासबोध ग्रन्थाच्या रचनेसंबंधानें मला एक कल्पना सुचवावयाची आहे. तिला मुळींच आधार नाहीं असें नाहा; परंतु ती बरोबर आहे असें ठरविण्यास, आहे त्याहून जास्त आधार पाहिजे. मला असें सुचवावयाचें आहे कीं, दशक ८ अखेरपर्यंतच काय तो दासबोध ग्रन्थ, अशी एकवार श्रीसमर्थांची कल्पना असावी. परंतु पुढें शिष्यांनीं वारंवार प्रश्न विचारून त्यांचीं उत्तरें देण्यांत बरेच फुटकळ समास लिहिले गेल्यामुळें, त्यांच्यांत

संगती जुळवून ते सर्व समास दासबोधांत सामील करण्यांत आले असावे; ही कल्पना माझ्याहि मनांत मोठीशी चांगली उतरते असें नाहीं. यापुढें उपलब्ध होणाऱ्या पुराव्यावरच ती खरी किंवा खोटी ठरणार आहे. ही कल्पना सुचण्याचीं कारणें येणेंप्रमाणें:—

(१) आठ दशकांच्या अखेरपर्यंत ग्रन्थाचा प्रवाह एकसारखा चाललेला दिसतो. त्यांत कोठेंहि पुनरुक्ति नाहीं. अनेक वेळां पुनरुक्ति करण्यांत आली आहे ती आठव्या दशकानंतर. श्रीसमर्थांना मुख्यतः अध्यात्मनिरूपण करावयाचें होतें. अध्यात्माशिवाय आठ दशकांच्या अखेरपर्यंत दुसरा विषय नाहीं.

(२) द० ७–१०–४२ ही ओवी अशी आहे;

**सरली शब्दाची खटपट। आला ग्रन्थाचा सेवट।**
**येथें सांगितलें पष्ट। सद्गुरुभजन॥**

आणि खरोखरच, आतां फक्त ज्ञानदशक सांगून ग्रन्थ संपूर्ण करावयाचा होता.

(३) नवव्या दशकाच्या सहाव्या समासाची २ री ओवी अशी आहे.

**हें दासबोधीं असे बोलिलें। ज्ञानदशकीं प्रांजळ केलें।**
**मूळमायेंत दाखविलें। पंचभूतिक॥**

ब्रह्माला आकाशाची उपमा देऊन आकाशाच्या ठिकाणीं जसा वायु, तशी ब्रह्माच्या ठिकाणीं मूळमाया व ती मूळमाया पंचभूतात्मक आहे, ही गोष्ट आपण दासबोधाच्या ज्ञानदशकांत ह्मणजे आठव्या दशकांत प्रांजळ केलेली आहे, असें समर्थ ह्मणतात. याचा अर्थ काय ? हें आह्मीं दासबोधांत सांगितलें आहे, ह्मणजे तर मग ९×६ लिहितेवेळीं तो दासबोधांतील ह्मणून लिहिला नाहीं असें होत नाहीं काय ?

अशीं माझी तीन कारणें आहेत. केवळ एवढ्याच कारणांवरून मी जें अनुमान काढीत आहें तें खरें मानणें इष्ट व्हावयाचें नाहीं. या अनुमानाला प्रतिकूल अशाही कांहीं गोष्टी आहेत; परंतु यापुढें जास्त पुरावा, अनुकूल किंवा प्रतिकूल, जसा मिळेल तसा मिळवून या कल्पनेचा निकाल लावतां यावा ह्मणून ती येथें नमूद करून ठेवली आहे; असो.

श्रीमत् दासबोधाची रचना शके १५८१ त झाली. त्या वेळची

महाराष्ट्राची स्थिति कशी होती ती काय सांगावयास पाहिजे? श्रीशिवाजी-महाराजांचा उदय झाला होता, उत्कर्ष व्हावयाचा होता.

**म्लेंच दुर्जन उदंड। बहुता दिवसाचें माजलें बंड।**

तें अजून पुरें मोडलें नव्हतें, किंबहुना तें बंड मोडण्याचा उपक्रम झाला होता. गोब्राह्मणांना आशा उत्पन्न झाली होती, परंतु त्यांचा प्रतिपाळ अजून व्हावयाचा होता. तिसऱ्या दशकांत संसाराचें जें चित्र काढण्यांत आलें आहे त्याचा शेवट परचक्र येऊन कांता धरून नेऊन भ्रष्टविण्यांत केला आहे. ह्मणजे असले अघोर प्रकार बंद होऊन पतिव्रता स्त्रियांचे आशीर्वाद श्रीशिवाजीमहाराजांस अजून मिळावयाचे होते.

**येक देव दुराचारीं। फोडिला बळें॥** ६-६-३४.
**येक देव जापाणिला। येक देव उदकीं टाकिला।**
**येक देव नेऊन घातला। पायातळीं॥** ६-६-३५.
**काय सांगों तीर्थमहिमा। मोडूनि गेला दुरात्मा॥** ६-६-३६.

असलीं बोलणीं अजून बंद पडलीं नव्हतीं. एकंदर समाजाला अजून आळा पडावयाचा होता.

**मता मतांचा गलबला। कोणी पुसेना कोणाला।**
**जो जे मतीं सांपडला। तयास तेंचि थोर॥** ११-२-२५.

अशी बेबंदशाही समाजांत माजली होती. जो तो शहाणा व स्वमताभिमानी झाला होता. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नव्हता. ब्राह्मणाची जी हीन स्थिति झाली होती ती तर बोलावयासच नको. सर्वस्वाला मुकून भुकेबंगाल बनून सर्वांच्या तिरस्कारास ते पात्र झाले होते. साऱ्यांनींच त्यांच्यावर शस्त्र उचललें होतें. परधर्मी राज्यकर्त्यांनीं तर उचललें होतेंच परंतु स्वकीय देखील त्यांना पाण्यांत पाहूं लागले होते. ब्राह्मणही स्वतः कोठें ताळयावर राहिले होते? तेहि बहकले होते.

**ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले।**
**गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्यांचे॥** १४-७-३१.

अशी ब्राह्मणांची स्थिति झाली होती. खरोखर पाहिलें तर ब्राह्मणांचा केवढा अधिकार! ब्राह्मण कोणाला ह्मणावें?

**करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।**
**तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥**

असे ब्राह्मण कोठें उरले होते? ब्राह्मणांचा आचार बुडविण्यांत शूद्रांना अभिमान वाटूं लागला होता. राज्य तर म्लेंच्छांचें झालें होतेंच, परंतु आपला धर्म तरी ब्राह्मणांनीं राखावयाचा होता! पण धर्माच्या बाबतींतहि त्यांना नीच्यांच्याच तोंडाकडे पाहाण्याची पाळी आली होती.

**गुरुत्व आलें नीच याती ॥**

साराश ब्राह्मण सर्वस्वाला मुकले होते. राज्य तर म्लेंच्छांकडे गेलें होतेंच, परंतु गुरुत्वहि तेच बळकावून बसून आपला धर्म त्यांच्या मुखांतून श्रवण करण्याची पाळी ब्राह्मणांवर आली होती.

**राज्य नेलें म्लेंचिं क्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं ।**
**आपण अरत्रीं ना परत्रीं । कांहींच नाहीं ॥** १४-७-३६.

अशी सर्वस्वीं परावलंबी स्थिति ब्राह्मणांची झाली होती, तरी पण शहाणे शहाणे त्यांतच प्रौढी मिरवीत. त्यांच्या कांहीं लक्षांत येईना कीं राज्य तर परक्यांच्या हातीं गेलेंच होतें, पण धर्महि त्याबरोबर जात होता!

**हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्तिच वळेना ।**
**मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥**

मूर्खपणाचा मिथ्या अभिमान एवढाच काय तो ब्राह्मणांजवळ शिल्लक राहिला होता, बाकी त्यांची सर्व शेंडी परक्यांच्या हातीं गेली होती. श्रीसमर्थ ह्मणतात, काय करतील बिचारे ब्राह्मण, हा असा प्रसंग वडिलांनीं त्यांच्यावर आणून ठेविला.

**आतांचे ब्राह्मणीं काये केलें ।**

कांहीं नसेल केलें, पण

**अन्न मिळेना ऐसें जालें ।**

अशी स्थिति तर त्यांना प्राप्त झाली होती ना? श्रीसमर्थ विचारतात, बाबांनो, तुह्मी अन्नाला महाग झालां आहांत, अन्नासाठीं तुम्हांला दाही दिशा हिंडावें लागत आहे, तरी पोटभर मिळत नाहीं तें नाहींच, असा अनुभव तुम्हांला आला, कां नाहीं?

**तुह्मा बहुतांचे प्रचितीस आलें । किंवा नाहीं ॥ १४-७-३९.**

मग आतां विनाकारण एकमेकांवर दोष घालण्यांत व वडिलांच्या नांवानें खडे फोडण्यांत कालक्षेप न करतां

**बरें ऐसा प्रसंग जाला । जाला तो होऊन गेला ।**
**आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शाहाणे करावें ॥ १४-८-१.**

असा समर्थांनीं ब्राह्मणांना उपदेश केला आहे.

समाजाला अशी हीन स्थिति प्राप्त झाल्यावर तेथें मत्सर नांदावयाला येतोच.

**मज नाहीं तुज साजेना । हें तों अवघें ठाउकें आहे जना ॥**

मला नाहीं, तर तुला कां ? तिऱ्हाइताच्या पदरांत पडलें तरी चालेल, पण तुला पचूं द्यावयाचें नाहीं, हा तर अशा वेळीं समाजाचा बाणा असतो ! राष्ट्राच्या भाग्याचे दिवस जवळ येत चालले म्हणजे अगोदर ब्राम्हणांची अशी विपन्नावस्था व्हावीच लागते कीं काय कोण जाणे! असा ईश्वरी संकेत असेल तर वाईट नाहीं, कारण अशी स्थिति प्राप्त झाली म्हणजे पुढची तरी आशा करावयास बरें पडतें ! असो.

समाजाला अशी हीन स्थिति प्राप्त झाली असतां श्रीमत् दासबोध ग्रन्थाचें प्रयोजन काय होतें तें शद्बांनीं सांगितलेंच पाहिजे काय ? सर्वतोपरि निकृष्ट स्थितीला पोंचलेल्या समाजाला ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची दिशा स्पष्ट रीतीनें आखून देऊन, शाश्वत सुखाची जोड करून देणें, हेंच या ग्रन्थाचें प्रयोजन होय. ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची संगती या ग्रन्थांत जशी घालून देण्यांत आली आहे तशी दुसऱ्या कोणत्याहि ग्रन्थांत क्वचितच असेल. स्वतःचें घर, दार, धंदा, स्वतःचीं बायकामुलें, यांच्या संबंधानें आपलें जें कर्तव्य आहे तेवढेंच काय तें ऐहिक कर्तव्य, असें समजावयाचें नाहीं. प्रपंच म्हणजे हा वर दिलेला स्वतःचा प्रपंच+राष्ट्राचा प्रपंच. स्वतःचा प्रपंच प्राणिमात्र करीत आहे. स्वबांधवांचा प्रपंच करण्यांतच मनुष्याची श्रेष्ठता आहे. हा बोध म्हणजेच महाराष्ट्रधर्माचें शिक्षण होय. अलिकडच्या भाषेंत यालाच स्वदेशाभिमान म्हणतात. असलें शिक्षण देणारा प्राकृतांत तरी एवढाच ग्रन्थ आहे. हाच या ग्रन्थाचा विशेष. इतर पारमार्थिक ग्रन्थाप्रमाणें यांत अध्यात्मनिरूपण असून शिवाय इतर ग्रन्थांतून जें नाहीं तें यांत आहे. हाच

या ग्रन्थांत आणि इतर ग्रन्थांत फरक होय. ग्रन्थ लिहिण्याचा श्रीसमर्थांचा हा जो विशिष्ट हेतु तो तत्कालापुरता कसा सिद्धीस गेला हें महाराष्ट्रवाचकांस तरी कोणी सांगवयास नको आहे. ह्या ग्रन्थाचा उपयोग चिरंतन आहे. धर्माला ग्लानि आली म्हणजे परमेश्वर जसा अवतार घेतो, त्याप्रमाणें समाजाला केव्हांहि तत्कालीन स्थितीप्रमाणें निकृष्टावस्था प्राप्त झाली ह्मणजे हा ग्रन्थ मार्गदर्शक होणार आहे. जें कार्य एकवार या ग्रन्थानें महाराष्ट्राच्या हातून घडविलें तेंच कार्य करण्याची पात्रता या ग्रन्थाच्या आश्रयानें केव्हांहि महाराष्ट्राला येणार आहे. ह्मणून महाराष्ट्राला या ग्रन्थाचा निदिध्यास लागावा अशी माझी इच्छा आहे. असा हा अपूर्व ग्रन्थ आहे. असा दुसरा कोणता ग्रन्थ आहे कीं जो लहानमोठे, संसारी परमार्थी, राजकारणी, व्यावहारिक, अशा सर्व प्रकारच्या लोकांना सारखा उपयुक्त आहे ! सहा वर्षांच्या मुलापासून तों ६० वर्षांच्या वृद्धापर्यंत सर्वांना याच्यांत बोध आहे. ज्याला उत्तम संसार करणें असेल त्यानें हा ग्रन्थ वाचावा. ज्याला स्वराज्य स्थापन करावयाचें असेल त्यानें या ग्रन्थाचें मनन करावें. स्थापिलेलें स्वराज्य ज्याला नीट चालवावयाचें असेल त्यालाहि याच्या वाचनापासून फायदा आहे. जे केवळ परमार्थ पाहात असतील त्यांना तर हा ग्रन्थ वेदतुल्य आहे. श्रीसमर्थांचा बोध, त्यांची कृति व त्यांचें चरित्र इत्यादिकांचें अध्ययन करणें, मनन करणें व तदनुरूप अत्यल्पांशानें वर्तन ठेवण्याचा प्रयत्न करणें, यांतच महाराष्ट्राचा तरणोपाय आहे. सबंध प्रस्तावनेंत कोणतीच गोष्ट मला निक्षून सांगतां आली नाहीं किंवा मी कोणताच आग्रह धरला नाहीं; परंतु सरतेशेवटीं एक गोष्ट आग्रहानें पण प्रेमपूर्वक महाराष्ट्रवाचकांपासून मागून घ्यावयाची आहे; ती ही च कीं, महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनाची काळजी बाळगणाऱ्या प्रत्येक सद्गृहस्थानें—विशेषतः—विद्यार्थ्यांनें श्रीसमर्थांच्या चरित्राचें अखंड श्रवण मनन करावें, त्यांच्या ग्रन्थांचें परिशीलन करावें व त्यांच्या चरणधूलीनें पुनीत झालेल्या स्थळांचें दर्शन घ्यावें !

# उपसंहार.

प्रस्तावना पुरी करण्यापूर्वी या आवृत्तीसंबंधानें, यापुढें प्रकाशित होणाऱ्या ग्रन्थांसंबंधानें व प्रकाशनापासून होणाऱ्या उत्पन्नासंबंधानें वाचकांस थोडीशी माहिती कळवावयाची आहे.

तीन वर्षें झालीं, ग्रन्थमालेच्या एका अंकांत महाराष्ट्रभाषेचे एकनिष्ठ सेवक रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचा श्रीरामदासांवर एक उत्कृष्ट निबंध प्रकाशित झाला होता. श्रीसमर्थांच्या हयातींत लिहिलेली दासबोधाची एक पोथी आपणांस मिळाली आहे व त्या पोथीवरून दासबोधाच्या हल्लीं प्रकाशित असलेल्या आवृत्त्या ताडून पाहातां प्रकाशित ग्रन्थांतून हजारों चुक्या राहिल्या आहेत, असें त्यांनीं त्या निबंधांत प्रसिद्ध केलें. त्यावरून धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेच्या चालकांना इच्छा झाली कीं, दासबोधाची असली शुद्ध आवृत्ति व समर्थांची अप्रकाशित प्रकरणें आपल्याकडून प्रकाशित व्हावींत. ही इच्छा रा. राजवाडे यांस कळवितां त्यांनीं सभेची विनंति मान्य करून सदरहु पोथी व त्यांना उपलब्ध झालेलीं श्रीसमर्थांचीं व रामदासीयांचीं प्रकरणें आमच्या हवालीं केलीं. पुढें असें वाटलें कीं, डोमगांवीं श्रीकल्याण महाराजांच्या मठांत जर दासबोधाची अस्सल पोथी आहे असें ह्मणतात, तर ती जाऊन पाहावी व इतर कोणत्याही प्रतीवरून दासबोध छापविण्यापेक्षां अस्सल पोथीवरूनच छापवावा. चाफळच्या मठांत एक दोन वेळां जाण्याचा पूर्वी सुयोग आल्यावरून श्रीबापुसाहेब महाराज यांचा थोडासा परिचय झाला होता. त्यांचे चरणीं वरील हेतु विदित केला. त्यांनीं कृपाळु होऊन श्रीकल्याण महाराजांच्या मठाचे अधिपति श्रीअंबादास महाराज यांना पत्र दिलें. तें पत्र श्रीअंबादास महाराज यांचेकडे जाऊन सादर केलें. त्यांनीं तें पत्र शिरसा वंद्य करून, मूळ पोथीचें—ह्मणजे श्रीसमर्थांनीं कल्याण महाराजांकरवीं लिहविलेल्या व स्वतः ठिकठिकाणीं शोध घातलेल्या अस्सल पोथीचें—व श्रीसमर्थकालीन वस्तूंचें पवित्र दर्शन घडविलें. मूळ पोथी फार बंदोबस्तानें ठेवलेली आहे. ती तेथून हालविणें शक्य नव्हतें व ती तेथून केव्हांहि दूर होऊं नये, अशीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे! तथापि त्या पवित्र ग्रन्थावरून केलेली एक प्रत, श्रीअंबादास महाराज

यांनीं पौष शुद्ध ३ शके १८२५ रोजीं आमच्या हवालीं केली. तीवरून सभेनें एक प्रत केली. सभेनें केलेली ही प्रत घेऊन शके १८२६ च्या वैशाखांत पुन्हां डोमगांवीं गेलों व तेथें मी आणि माझे स्नेही, मयूरभक्त रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर व रा. रा. गोविंद काशीनाथ चांदोरकर वकील, धुळें, अशा तिघांनीं मिळून सभेनें केलेली प्रत अस्सल पोथीवरून शब्दशः तपासली. हें काम करून धुळ्यास येतों तों, बडोदें येथील मठांतील श्रीदादामहाराज यांची स्वारी धुळ्यास आली होती, त्यांची भेट झाली. त्यांचा मुक्काम येथें तीन महिने होता. श्रीमत् दासबोधाचें सारें रहस्य समजावून सांगण्यास श्रीसमर्थांवांचून अन्य कोण समर्थ असणार? परंतु दासबोधाचा अर्थ सांगण्यांत श्रीदादामहाराजांइतके अधिकारी मला आढळले नाहींत. त्यांनीं कृपा करून दासबोधांतील अवघड स्थळांचा अर्थ समजावून सांगितला व तेणेंकरून टिपा देण्यास पुष्कळच मदत झाली. १८२६ च्या भाद्रपदांत निर्णयसागर छापखान्यांत छापण्याचें काम सुरू केलें व आतां सरासरी एक दोन महिन्यांत ग्रन्थ वाचकांस सादर करण्याची वेळ आली आहे.

ह्या आवृत्तीसंबंधानें वाचकांस इतकेंच कळवावयाचें कीं, तिच्या योगानें माझें स्वतःचेंच पूर्ण समाधान होत नाहीं, तेव्हां ते इतरांचें कोठून होणार? कांहीं ठिकाणीं टिपा देण्यांत व अन्यत्र माझ्या हातून दोष झाले आहेत. मीं दिलेल्या टिपांवर कोणींहि सर्वस्वीं विश्वसून राहूं नये. ज्या अर्थाबद्दल मला संशय वाटला त्यापुढें मीं संशय दर्शविण्यास प्रश्नचिन्ह केलें आहे. द. ३ ६·२६ यांत 'पाचाव' शब्द आहे. प्रकाशित प्रतींतून 'पांचवा' छापलें आहे. 'पाचाव' ह्या शब्दाचा अर्थ मला ठाऊक नव्हता, कोशांत सांपडला नाहीं, वैद्यबुवांना कळेना, ह्मणून संशय दर्शवून 'पांचवा' अशी टीप दीली. नंतर भोळाराम महाराजांच्या मठांत भालगांवीं गेलों असतां, तेथें अधिपतींना विचारिलें तर त्यांनीं सहज सांगितलें कीं, दृष्ट लागून दुःखण्यानें उलट खाली ह्मणजे त्याला पाचाव म्हणतात? आणखी एकवार आवृत्ति काढण्याचा योग यावा अशी इच्छा आहे. टिपा सोडून दिल्या तर, दासबोधाची इतकी शुद्ध आवृत्ति दुसरी नाहीं, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आजपर्यंत प्रकाशित असलेली दासबोधाची कोणतीहि पोथी किंवा पुस्तक या पोथीवरून ताडून पाहिल्यास

प्रकाशित ग्रंथांतून हजारों चुका वाचकांच्या निदर्शनास येणार आहेत. अर्थ जरी बदलत नसला तरी, श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेला एकही शब्द बदलतां कामा नये, असें माझें मत आहे. त्या तशाच्या तशाच शब्दांत गोडी आहे, सामर्थ्य आहे! त्या शब्दांना हल्लींचें रूप देण्याचा आपणांस काय अधिकार आहे? परंतु जेथें अर्थहि बदलतो अशीं शेंकडों स्थळें वाचकांस आढळतील! अस्सल पोथींत श्री, मत्छर, ब्रंह्म, अग्र, संलग्न, लावंण्य, रंम्य, आरंण्य, जंन्म, हीण, द्वेश, भाशन, संपति, मत्त इत्यादि लिपी आहे तेथें श्री, मत्सर, ब्रह्म, अग्र, संलग्न, लावण्य, रम्य, आरण्य, जन्म, हीन, द्वेष, भाषण, संपत्ति, मत ह्या पद्धतीचा उपयोग केला आहे.

श्रीसमर्थांनीं जे शोध घातले ते बहुतेक टिपांत दर्शविले आहेत. प्रथम त्यांनीं कोणता पाठ सांगितला व ग्रन्थ तपासतांना कोणता शोध घातला याचा विचार करण्यांत मौज आहे. उदाहरणार्थ,

**गाईत्रीमंत्राचा विचारु । सांगे तो साचार कुळगुरु ॥** ५-२-८.

असा पाठ प्रथम होता, त्यांत विचारु खोडून त्याऐवजीं उच्चारु घालण्यांत श्रीसमर्थांचा हेतु उघड दिसत आहे. आपले कुलगुरु गायत्रीमंत्राचा आपणांस विचार सांगतात कां नुसता उच्चार सांगतात हें आपण जाणतच आहोंत.

प्रस्तुतच्या आवृत्तीच्या आरंभीं एक चित्र दिलें आहे. श्रीसमर्थांच्या ह्यातींत एका शिष्यानें त्यांच्या तीन तसबिरी काढल्या. एक सज्जनगडावर शेजघरांत आहेच. दुसरी भागानगरास व तिसरी तंजावरास आहे, असें सांगतात. गडावर असलेल्या तसबिरीवरून घेतलेली श्रीसमर्थांची तसबीर उजव्या बाजूला दिली आहे. डाव्या बाजूला श्रीसमर्थांच्या पादुका आहेत. श्रीसमर्थ ज्या खडावा वापरीत असत त्याच ह्या आहेत. गडावर समाधीच्या मागच्या बाजूला त्या ठेवलेल्या आहेत. अनंतकवींनीं केलेल्या वर्णनांत ते ह्मणतात,

**ज्याची पूर्ण समाधि सज्जनगडीं गुप्त प्रकारें असे ।**
**पादूकांवारि शेष शोभत असे दोहींकडे आरसे ।**
**ज्याची पुण्यतिथी सुदीन नवमी उत्साह होतो असे ।**
**ऐसा सद्गुरु हा अनंत कविचा बद्धांस तारीतसे ॥**

त्या ह्या पादुका होत. हीं चित्रें देण्याचे कामीं माझे स्नेही रा. हरी केशव फडके, चित्रकार, मुंबई, यांची मला पुष्कळ मदत झाली.

## यापुढें

आणखी सहा ग्रन्थ प्रसिद्ध करण्यापुरती सामुग्री आमचेजवळ आज आहे. ह्याचें मुख्य श्रेय श्रीबापुसाहेब महाराज, चाफळ मठाचे अधिपति व श्रेष्ठांचे वंशज यांचेकडे आहे. त्यांच्याच कृपाप्रसादानें हीं कामें तडीस जावयाचीं आहेत. चाफळ मठांतील सर्वसंग्रहाचा महाराजांनीं आह्मांस उपयोग करूं दिला, इतकेंच नव्हे, तर ठिकठिकाणच्या मठपतींना व सांप्रदायिकांना त्यांनीं एक आज्ञापत्र दिलें आहे. हें आज्ञापत्र घेऊन कांहीं मठांत आम्ही गेलों होतों व पुष्कळ मठांतून अजून जाणें आहे. खुद्द चाफळास रामभक्तिपरायण केशव कृष्ण ढवळे यांच्या दप्तरीं कांहीं उपयुक्त कागदपत्रें मिळालीं. तसेंच श्रीदिवाकर गोसांवी यांचे वंशज रा. भ. प. परशराम नागेश उपाध्ये यांच्यापासून कांहीं बहुमोल अशीं महत्वाचीं पत्रें मिळालीं. चाफळ येथील रा. रा. बाळाभाऊ पेंढारकर यांनीं सर्वतोपरि आह्मांस सहाय्य केलें. श्रीकल्याणमहाराजांचा मठ डोमगांवीं आहे. मठपति श्रीअंबादास महाराज यांचे आह्मांवर अनंत उपकार आहेत. मठांतील सर्व संग्रह त्यांनीं आमच्या हवालीं केला आहे. त्या संग्रहांतलें एक बाड केवढें तरी मोठें आहे ! आपण दिलेल्या मदतीचें फळ पाहण्यास श्रीअंबादास महाराज राहिले नाहींत याचें वाईट वाटतें. त्यांना १८२६ च्या आषाढांत देवाज्ञा झाली! ह्याच गांवीं एक 'पोथा' आह्मांस मिळाला. त्यांत समर्थांच्या कवितेचा बराच मोठा संग्रह आहे. तो इतका लांब रुंद आहे कीं, त्याला त्या गावीं 'पोथा' ह्मणतात. श्रीदत्तात्रय महाराज यांनीं पुष्कळ मदत केली आहे व आणखी करणार आहेत. रा. भ. प. सावळाराम बुवा, दिगंबर बुवा, नाना बुवा, निंबराज बुवा आदिकरून डोमगांवकरांमीं कांहींना कांहीं मदत केलीच आहे. फार काय सांगावें, डोमगांवच्या प्रत्येक घराचे आह्मी ऋणी आहोंत, कारण प्रत्येक घरांतून थोडी फार तरी भिक्षा मिळाली आहे. इतका संग्रह दुसऱ्या कोणत्याहि मठांत मिळाला नाहीं. डोमगांवीं असतांना प्रत्यक्ष व नंतर पत्रद्वारें रा. रा. यशवंतराव व रा. रा. जयवंतराव पोळ या बंधुद्वयानें आह्मांस कितीतरी प्रेमानें आणि कौतुकानें सहाय्य दिलें आहे. श्रीजगन्नाथ महाराजांचा मठ तडोळें येथें आहे. विद्यमान मठपति श्रीदत्तात्रय सखाराम महाराज यांनीं बराच संग्रह हवालीं केला आहे. पांघरी येथील मठपति श्रीअनंत बुवा यांनींहि कांहीं उपयुक्त संग्रह दिला आहे. श्रीसमर्थांची जन्मभूमि जांबगांव!

सांप्रदायिकांची ही जवळची अयोध्या होय ! तेथेंहि कांहीं संग्रह मिळाला व कांहीं मिळावयाचा आहे. याशिवाय श्रीउद्धवस्वामींचा टांकळी येथील मठ व श्रीभोळाराम महाराजांचा भालगांव येथिल मठ या दोन ठिकाणचा संग्रह मिळाला आहे. श्रीवासुदेव गोसावी यांचा मठ मढें येथें आहे. तेथें अजून जावयाचें आहे, परंतु तेथील विद्यमान मठपतींचे चिरंजीव रा. भ. प विश्वनाथ रामदास बुवा यांनीं गेल्या माघांत गडावर उत्सवास येतांना कांहीं संग्रह मुद्दाम आणून दिला आहे. अशा रीतीनें ठिकठिकाणीं जाऊन संग्रह मिळविण्याचे कामीं मला माझे स्नेही रा. भास्कर वामन भट वकील, धुळें, व रा. गोपाळ रावजी गोगटे वकील, भुसावळ, यांची फार मदत होत आहे.

आह्मांजवळ आतांपर्यंत जेवढा संग्रह जमला आहे, तेवढ्यावरून त्याचे एकंदर सात भाग होतील.*

१ श्रीमत् दासबोध
२ श्रेष्ठांचे ग्रन्थ
३ समर्थांचीं अप्रकाशित प्रकरणें
४ समर्थांचीं प्रकाशित प्रकरणें
५ रामदासीयांचीं रामायणें
६ रामदासीयांचीं इतर प्रकरणें
७ समर्थांच्या संबंधीं कागदपत्रें,
समर्थांचें सचित्र व साधार चरित्र,
सांप्रदायाचा साद्यंत इतिहास, वगैरे.

पैकीं पहिला भाग वाचकांस सादर करण्याची वेळ आज आली आहे. दुसऱ्या भागांत श्रेष्ठांचे दोन ग्रन्थ, भक्तिरहस्य व सुगमोपाय, हे येतील. श्रेष्ठांनीं भक्तिरहस्य ह्मणून ग्रन्थ केला आहे, असा नुसता उल्लेख बखरींत असलेला आजपर्यंत ठाऊक होता. सुगमोपायाचें तर नांवहि ऐकण्यांत नव्हतें. हे दोन्ही ग्रन्थ चाफळ मठीं उपलब्ध झाले. श्रीसमर्थांचीं अप्रकाशित प्रकरणें आतांपर्यंत इतकीं उपलब्ध झालीं आहेत कीं त्यांचे कदाचित् दोन भाग करावे लागतील, असा अदमास आहे. आजपर्यंत दासबोधाची ज्याप्र-

* आज मित्तीला हा संग्रह किती तरी वाढला आहे व त्याचे किती भाग होतील याचा आतां नक्की अंदाज करतां येत नाहीं. विजयादशमी १८२९.

माणें शुद्ध आवृत्ति नव्हती, त्याच प्रमाणें समर्थांचीं जीं इतर प्रकरणें प्रकाशित आहेत त्यांताहि हजारों चुका झालेल्या आहेत. यासाठीं प्रकाशित प्रकरणांचाहि एक भाग काढणें आवश्यक झालें आहे. त्यापुढच्या एका भागांत श्रीसमर्थकालीन रामदासीयांचीं रामायणें द्यावयाचीं असून दुसऱ्या भागांत त्यांचीं इतर प्रकरणें द्यावयाचीं आहेत. खुद्द श्रीकल्याण महाराजांची कांहीं कविता मिळाली आहे. ती भक्तिपर व अध्यात्मपर असून फार प्रेमळ आहे. तिचा समावेश याच सहाव्या भागांत होईल. शेवटचा भाग ह्मणजे श्रीसमर्थांच्या चरित्राचा. यांत आरंभीं श्रीसमर्थांच्या वेळचा व नंतरचा कांहीं महत्त्वाचा पत्रव्यवहार देऊन, नंतर त्यांचें सचित्र व साधार चरित्र द्यावयाचें आहे. श्रीसमर्थांना जांबगांवीं ज्या पारावर अनुग्रह झाला तेथील मारुतीची मूर्ति, त्यांनीं स्थापन केलेले अकरा मारुती, त्यांची चाफळखोऱ्यांतली रामघळ, चंद्रगिरीच्या डोंगरांतली गुहा, सज्जनगड, गडावरील श्रीरामपंचायतन, समर्थांच्या वेळच्या त्यांच्या वस्तु, कुबडी, गुप्ती, वगैरे, समाधीचें मंदिर व खुद्द समाधि, इत्यादि चित्रें या भागांत द्यावीं असा हेतु आहे. याच भागांत शेवटीं ठिकठिकाणच्या मठांची आजपर्यंतची हालहवाल देऊन एकंदर सांप्रदायाचा इतिहास द्यावयाचा आहे. अशीं एकंदर पुढचीं कार्यें आहेत. तीं प्रभुसत्तेनें घडतील तेव्हां खरी! कोणताही भाग ५।६ शें पृष्ठांहून कमी होण्याचा संभव नाहीं. प्रतिवर्षीं एक एक भाग प्रसिद्ध व्हावा अशी योजना आहे. हा सर्व खटाटोप करून द्रव्यरूपानें कदाचित् कांहीं उत्पन्न झाल्यास त्या

## उत्पन्नाचा विनियोग

श्रीसमर्थ सांप्रदायाच्या कोणत्या तरी कार्याकडे व्हावा असा सभेचा संकल्प आहे, तोहि वाचकांच्या कानीं घालून ठेवणें गैरवाजवी होणार नाहीं. सत्कार्योत्तेजक सभा ह्मणजे कांहीं व्यापार करणारी मंडळी नव्हे. तेव्हां तिला या उत्पन्नाचा अभिलाषहि नाहीं. उत्पन्नाचा विनियोग कसा करावयाचा हें कांहीं आज ठरवावयास नको, कारण अजून कशासच कांहीं ठिकाण नाहीं, आतांशीं कोठें पहिला भाग प्रसिद्ध होत आहे. परमेश्वराच्या कृपेनें तशी वेळ आली ह्मणजे जें करणें तें ठरविण्यांत येईल.

सरतेशेवटीं आभार मानावयाचे. वर ज्या ज्या सद्गृहस्थांचा व सत्पुरु-

यांचा निर्देश करण्यांत आला आहे त्यांचा तर मी आभारी आहेंच, पण त्यांशिवाय मला माझ्या कित्येक मित्रांचें या कामीं सहाय होत आहे त्यांचाहि मी आभारी आहे. वर नमूद केलेल्या मठपतींची व इतरांची यापुढें अशीच मदत होत जाईल अशी मला आशा आहे. या सांप्रदाया-संबधानें जेवढें कांहीं उपलब्ध होण्यासारखें आहे तेवढें सर्व प्रकाशित होऊन सांप्रदायाचें ज्ञान सार्वत्रिक व्हावें, असा हेतु आहे. अर्थात् तो हेतु तडीस जाणें सर्वस्वीं श्रीरामदासाभिमानी सांप्रदायिकांवर अवलंबून आहे, तेव्हां त्यांनीं हें कार्य आपलेंच आहे असें मानावें, अशी त्यांस प्रार्थना आहे. याशिवाय मी आणखी कित्येकांचा ऋणी आहे पण फिटेपर्यंत तें ऋण अव्यक्तच ठेवणें बरें ! श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

धुळें,
विजया दशमी १८२७.

शंकर श्रीकृष्ण देव.



श्री

# दुसरी आवृत्ति



या दुसऱ्या आवृत्तींत मूळ ग्रन्थ, उघडच आहे, जसाच्या तसाच छापला आहे. टिपा मात्र कांहीं जास्त ठिकाणीं दिल्या आहेत. संसारासंबंधानें पहिल्या आवृत्तीचे वेळीं जें कोडें पडलें होतें त्याचा या आवृत्तींत, माझ्या मतें, उलगडा केला आहे व सामान्य विचिकित्सेंतील कांहीं मतांची दुरुस्ती केली आहे, याशिवाय प्रस्तावनेंत हि फारसा फरक केलेला नाहीं. तथापि या आवृत्तीचा विशेष ह्मटला ह्मणजे शेवटीं जोडलेली दासबोधांतील विषयांची त्रोटक सूची होय. निबंधलेखक, वृत्तपत्रकार, व्याख्याते, स्वयंसेवक, राष्ट्रीय शिक्षक, कीर्तनकार आणि विशेषतः श्रीरामदासांच्या ग्रन्थांचा आस्थापूर्वक अभ्यास करणारे देशभक्त विद्यार्थी इत्यादिकांना ही सूची उपयुक्त झाल्यावांचून राहणार नाहीं, असा भरंसा आहे.

धुळें,
विजया दशमी १८२९



चिटणीस
सत्कार्योत्तेजक सभा—धुळें.

## श्रीसद्गुरुस्तवन.

### पद.

चाल—श्रीविधिहरिहर मूर्ति सावळी०

स्वामी माझा योगिराजा आवडतो हृदईं ।
दिवसरजनी न गमे जनीं नावडे कांहीं ॥ ध्रु०

आदिशक्ती परमेश्वर षड्गुण ईश्वर ।
त्याचें अंतर परात्पर शुद्ध विचार ।
योगेश्वर अपरांपर तोचि अवतार ।
हीन दीन जना करि पावन माझें माहेर ॥ १ ॥

अध्यात्मखाणी ग्रन्थ वाणी वदोन गेली ।
न कळे महिमा न गणे सीमा काये बोलिली ।
भक्तमंडळी भूमंडळीं कोणें मोजिली ।
उत्तम मूर्ति अपार कीर्ति विश्वीं दुमदुमिली ॥ २ ॥

करुणानिधि करुणाकर कृपें पाहिलें ।
बद्ध मुमुक्ष साधक सिद्ध होउनी ठेले ।
जडमूढ प्राणी चरणस्पर्शे **कल्याण** जाले ।
माया ममता विवरुनि पाहातां निजपद लाधले ॥ ३



# श्रीमत् दासबोध.

## अनुक्रमणिका.

॥ भीमदशक एकादश ॥ ११ ॥



॥ विवेकवैराग्यनाम दशक द्वादश ॥ १२ ॥



॥ नामरूप दशक त्रयोदश ॥१३॥



॥ अखंडध्याननाम दशक चतुर्दश ॥ १४ ॥



॥ आत्मदशकनाम पंचदश ॥१५॥

॥ दशक षोडश सप्ततिन्वयाचा ॥ १६ ॥



॥ दशक सप्तदश प्रकृतिपुरुषनाम ॥ १७ ॥



॥ दशक अष्टादश बहुजिनसी ॥ १८ ॥



॥ दशक शिकवणनाम एकोनविंशति ॥ १९ ॥



॥ विसावा पूर्ण दशक ॥ २० ॥

# ॥ श्रीमत् दासबोध ॥

## ॥ दशक प्रथम स्तवननाम ॥ १ ॥

### ॥ श्रीराम ॥

श्रोते पुसती कोण ग्रन्थ । काय बोलिले जी येथ । श्रवण केलियानें प्राप्त । काय आहे ॥ १ ॥ ग्रन्था नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद । येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥ २ ॥ नवविधा भक्ति आणि ज्ञान । बोलिलें वैराग्याचें लक्षण । बहुधा अध्यात्मनिरोपण । निरोपिलें ॥३॥ भक्तिचेन योगें देव । निश्चयें पावती मानव । ऐसा आहे अभिप्राव । ईये ग्रन्थीं ॥ ४ ॥ मुख्य भक्तीचा निश्चयो । शुद्धज्ञानाचा निश्चयो । आत्मस्थितीचा निश्चयो । बोलिला असे ॥ ५ ॥ शुद्ध उपदेशाचा निश्चयो । सायोज्यमुक्तीचा निश्चयो । मोक्षप्राप्तीचा निश्चयो । बोलिला असे ॥ ६ ॥ शुद्ध स्वरूपाचा निश्चयो । विदेहस्थितीचा निश्चयो । अलिप्तपणाचा निश्चयो । बोलिला असे ॥ ७ ॥ मुख्य देवाचा निश्चयो । मुख्य भक्ताचा निश्चयो । जीवशिवांचा[२] निश्चयो । बोलिला असे ॥ ८ ॥ मुख्य ब्रह्माचा निश्चयो । नाना मतांचा निश्चयो । आपण कोण हा निश्चयो । बोलिला असे ॥ ९ ॥ मुख्य उपासनालक्षण । नाना कवित्वलक्षण । नाना चातुर्यलक्षण । बोलिलें असे ॥ १० ॥ मायोद्भवाचें[३] लक्षण । पंचभूतांचें लक्षण । कर्ता कोण हें लक्षण । बोलिलें असे ॥ ११ ॥ नाना किंर्तें[४] निवारिले । नाना संशयो छेदिले । नाना आशंका फेडिले । नाना प्रश्न ॥ १२ ॥ ऐसें बहुधा निरोपिलें । ग्रन्थगर्भी जें बोलिलें । तें अवघेंचि अनुवादलें । न वचे किं कदा ॥ १३ ॥ तथापि अवघा दासबोध ।

---

१ स्पष्ट. २ जीवात्मा आणि शिवात्मा ह्मणजे परमात्मा यांचा. ३ मायेच्या उत्पत्तीचें. ४ शंका.

दशक फोडून केला विशद । जे जे दशकीचा अनुवाद । ते ते दशकीं बोलिला ॥ १४ ॥ नाना ग्रन्थांच्या संमती । उपनिषदें वेदांत श्रुती । आणी मुख्य आत्मप्रचीती । शास्त्रेंसहित ॥ १५ ॥ नाना संमतीअन्वयें । ह्मणोनि मिथ्या ह्मणतां नये । तथापि हें अनुभवासि ये । प्रत्यक्ष आतां ॥ १६ ॥ मत्सरें यासी मिथ्या ह्मणती । तरी अवघेचि ग्रन्थ उछेदती । नाना ग्रन्थांच्या संमती । भगवद्वाक्यें ॥ १७ ॥ शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता । उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणी वेदांत ॥ १८ ॥ भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता । गणेशगीता येमगीता । उपनिषदें भागवत ॥ १९ ॥ इत्यादिक नाना ग्रन्थ । संमतीस बोलिले येथ । भगवद्वाक्यें येथार्थ । निश्चयेंसीं ॥ २० ॥ भगवद्वचनीं अविश्वासे । ऐसा कोण पतित असे । भगवद्वाक्याविरहित नसे । बोलणें येथीचें ॥ २१ ॥ पूर्ण ग्रन्थ पाहिल्याविण । उगाच ठेवी जो दूषण । तो दुरात्मा दुराभिमान । मत्सरें करी ॥ २२ ॥ अभिमानें उठे मत्सर । मत्सरें ये तिरस्कार । पुढें क्रोधाचा विकार । प्रबळे बळें ॥ २३ ॥ ऐसा अंतरीं नासला । कामक्रोधें खवळला । अहंभावें पालटला । प्रत्यक्ष दिसे ॥ २४ ॥ कामक्रोधें लिथाडिला । तो कैसा ह्मणावा भला । अमृत सेवितांच पावला । मृत्य राहो ॥ २५ ॥ आतां असो हें बोलणें । अधिकारासारिखें घेणें । परंतु अभिमान त्यागणें । हें उत्तमोत्तम ॥ २६ ॥ मागां श्रोतीं आक्षेपिलें । जी ये ग्रन्थीं काय बोलिलें । तें सकळही निरोपिलें । संकळित मागें ॥ २७ ॥ आतां श्रवण केलीयाचें फळ । क्रिया पालटे तत्काळ । तुटे संशयाचें मूळ । येकसरां ॥ २८ ॥ मार्ग सांपडे सुगम । नलगे साधन दुर्गम । सायोज्यमुक्तीचें वर्म । ठाइं पडे ॥ २९ ॥ नासे

---

१ नाना ग्रन्थांच्या संमतीच्या योगानें. २ मोहिनीरूप श्रीविष्णु देवांस अमृत वाढीत असतां राहु लबाडीनें देवांच्या पंक्तींत जाऊन वसला. ही गोष्ट चंद्रसूर्यांनीं श्रीविष्णूच्या नजरेस आणल्यावरून राहु अमृत सेवित असतांच श्रीविष्णूनें त्याचा शिरच्छेद केला. तद्वत् राहूप्रमाणें अंतरीं नासलेल्या लोकांना ह्या अमृततुल्य ग्रन्थापासून कांहीं उपयोग होणें नाहीं.

अज्ञान दुःख भ्रांती । शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती । ऐसी आहे फळश्रुती । ईये ग्रन्थीं ॥ ३० ॥ योगियांचें परम भाग्य । आंगीं बाणे तें वैराग्य । चातुर्य कळे यथायोग्य । विवेकेंसहित ॥ ३१ ॥ भ्रांत अवगुणी अव-लक्षण । तेचि होती सुलक्षण । धूर्त तार्किक विचक्षण । समयो जा-णती ॥ ३२ ॥ आळसी तेचि साक्षपी होती । पापी तेचि प्रस्तावंती । निंदक तेचि वंदू लागती । भक्तिमार्गासी ॥ ३३ ॥ बद्धचि होती मुमुक्ष । मूर्ख होती अति दक्ष । अभक्तचि पावती मोक्ष । भक्तिमार्गें ॥ ३४ ॥ नाना दोष ते नासती । पतित तेचि पावन होती । प्राणी पावे उत्तम गती । श्रवणमात्रें ॥ ३५ ॥ नाना धोके देहबुद्धीचे । नाना कित संदे-हाचे । नाना उद्वेग संसाराचे । नासती श्रवणें ॥ ३६ ॥ ऐसी याची फलश्रुती । श्रवणें चुके अधोगती । मनास होय विश्रांती । समा-धान ॥ ३७ ॥ जयाचा भावार्थ जैसा । तयास लाभ तैसा । मत्सर धरी जो पुंसा । तयास तेंचि प्राप्त ॥ ३८ ॥ इति श्री दासबोधे गुरु-शिष्यसंवादे ग्रन्थारंभलक्षणनाम समास प्रथम ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीराम ॥

ॐनमोजि गणनायेका । सर्वसिद्धिफळदायेका । अज्ञानभ्रांति-छेदका । बोधरूपा ॥ १ ॥ माझिये अंतरीं भरावें । सर्वकाळ वास्तव्य करावें । मज वाक्शून्यास वदवावें । कृपाकटाक्षेंकरूनी ॥ २ ॥ तुझिये कृपेचेनि बळें । विनुळती भ्रांतीचीं पडळें । आणी विश्वभक्षक काळें । दास्यत्व कीजे ॥ ३ ॥ येतां कृपेची निज उडी । विघ्नें कांपती बापुडीं । होऊन जाती देशधडी । नाममात्रें ॥ ४ ॥ ह्मणौन नामें विघ्नहर । आह्मा अनाथांचें माहेर । आदिकरूनां हरीहर । अमर वंदिती ॥ ५ ॥ वंदूनियां मंगळनिधी । कार्य करितां सर्वसिद्धी । आघात अडथाळे उ-पाधी । बाधूं सकेना ॥ ६ ॥ जयाचें आठवितां ध्यान । वाटे परम समाधान । नेत्रीं रिघोनियां मन । पांगुळे सर्वांगीं[१] ॥ ७ ॥ सगुण रू-

---

१ इतर सर्व इंद्रियांतून निघून मन फक्त डोळ्यांत येऊन बसतें.

पाची ठेव । माहा लावण्य लाघव । नृत्य करितां सकळ देव । तटस्त होती ॥ ८ ॥ सर्वकाळ मदोन्मत्त । सदा आनंदें डुल्लत । हरुषें निर्भरें उद्दितें । सुप्रसन्नवदनु ॥ ९ ॥ भव्यरूप वितंड । भीममूर्ति माहा प्रचंड । विस्तीर्ण मस्तकीं उदंड । सिंधूर चर्चिला ॥ १० ॥ नाना सुगंध परिमळें । थबथबा गळती गंडस्थळें । तेथें आलीं षट्पदकुळें । झुंकारशब्दें ॥ ११ ॥ मुर्डीव शुंडादंड सरळें । शोभे अभिनव आवाळें । लंबित अधर तिक्षण गळें । क्षणक्षणा मंदेसत्वी ॥ १२ ॥ चौदा विद्यांचा गोसांवी । हरस्वें लोचन ते हिलांवी । लवलवित फडकावी । फडै फडै कर्णथापा ॥ १३ ॥ रत्नखचित मुगुटीं झळाळ । नाना सुरंग फांकती कीळ । कुंडलें तळपती नीळ । वरी जडिले झमकती ॥ १४ ॥ दंत शुभ्र सद्दट । रत्नखचित हेमकट्ट । तयो तळवटीं पत्रें नीट । तळपती लघु लघु ॥ १५ ॥ लवथवित मेंलपे दोंद । वेष्टित कटीं नागबंद । क्षुद्र घंटिका मंद मंद । वाजती झणत्कारें ॥ १६ ॥ चतुर्भुज लंबोदर । कासे कासिला पीतांबर । फडके दोंदिचा फणीवर । धुधूकार टाकी ॥ १७ ॥ डोलवी मस्तक जिव्हा लाळी । घालून बैसला वेटाळीं । उभारोनि नाभिकमळीं । टकमकां पाहे ॥ १८ ॥ नाना याति कुशममाळा । व्यांळेंपरियंत रुळती गळा । रत्नजडित हृदयकमळा- । वरी पदक शोभे ॥ १९ ॥ शोभे फरश आणी कमळ । अंकुश तिक्षण तेजाळ । येके करीं मोदकगोळ । तयावरी अति प्रीति ॥ २० ॥ नट नाट्य कळा कुसरी । नाना छंदें नृत्य करी । टाळ मृदांग भरोवरी । उपांगें हुंकारे ॥ २१ ॥ स्थिरता नाहीं येक क्षण । चपळविशाई अग्रगण । साजिरी मूर्ति सुलक्षण ।

---

१ पुष्कळ, अतिशय. २ उल्हासयुक्त. ३ भ्रमरांचा समुदाय. ४ गंडस्थळ. ५ मदसत्व, तक्ष्ण मदसत्व क्षणक्षणा गळे. ६ र्‍हस्व., ७ हालवी. ८ तेज. ९ दातांच्या तळवटीं ह्मणजे खालीं सुवर्णादिकांचीं पत्रें चकाकतात. १० हालतें. ११ कटी. १२ कुसुममाळा. १३ सर्पापर्यंत; सर्प नाभिस्थानीं असल्यामुळें, नाभिपर्यंत असा अर्थ. १४ कौशल्य. १५ सामुग्री. १६ नृत्य होत असतांना जो हुंकार होतो तो नृत्याचा उपांग होय.

लावण्यखाणी ॥२२॥ रुणझुणा वाजती नेपुरें। वांकी बोभाटती गजरें। घागरियासहित मनोहरे। पाउलें दोनी ॥ २३ ॥ ईश्वरसभेसी आली शोभा। दिव्यांबराची फांकली प्रभा। साहित्यविशंई सुलभा। अष्ट नायका होती ॥ २४ ॥ ऐसा सर्वांगें सुंदरु। सकळ विद्यांचा आगरु। त्यासी माझा नमस्कारु। साष्टांग भावें ॥ २५ ॥ ध्यान गणेशाचें वर्णितां। मतिप्रकाश होये भ्रांता। गुणानुवाद श्रवण करितां। वोळे सरस्वती ॥ २६ ॥ जयासी ब्रह्मादिक वंदिती। तेथें मानव बापुडें किती। असो प्राणी मंदमती। तेहीं गणेश चिंतावा ॥ २७ ॥ जे मूर्ख अवलक्षण। जे कां हीनाहूनि हीन। तेचि होती दक्ष प्रविण। सर्वविशंई ॥ २८ ॥ ऐसा जो परम समर्थ। पूर्ण करी मनोरथ। संप्रचीत भजन स्वार्थ[1]। कलौ चंडीविनायकौ ॥ २९ ॥ ऐसा गणेश मंगळमूर्ती। तो म्यां स्तविला येथामती। वांछया धरून चित्तीं। परमार्थाची ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे गणेशस्तवननाम समास दुसरा ॥ २ ॥

॥ श्रीराम ॥

आतां वंदीन वेदमाता। श्रीशारदा ब्रह्मसुता। शब्दमूळ वाग्देवता। माहं माया[2] ॥ १ ॥ जे उठवी शब्दांकुर। वदे वैखरी अपार। जे शब्दाचें अभ्यांतर। उकलून दावी ॥ २ ॥ जे योगियांची समाधी। जे धारिष्टांची धृतबुद्धी[3]। जे विद्या अविद्या उपाधी। तोडून टाकी ॥ ३ ॥ जे माहा पुरुषाची भार्या। अति सलग्न अवस्ता तुर्या। जयेकरितां महत्कार्या। प्रवर्तले साधु ॥ ४ ॥ जे महंतांची शांती। जे ईश्वराची निज शक्ती। जे ज्ञानियांची विरक्ती। नैराशशोभा ॥ ५ ॥ जे अनंत ब्रह्मांडें घडी। लीळाविनोदेंचि मोडी। आपण आदिपुरुषीं दडी। मारून राहे ॥ ६ ॥ जे प्रत्यक्ष पाहातां आडळे। विचार घेतां तरी नाडळे। जयेचा पार नकळे। ब्रह्मादिकांसी ॥ ७ ॥ जे सर्व नाटकअंतर्कळा। जा-

---

१ त्याचें भजन करणें हाच स्वार्थ होय, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे.
२ महा माया. ३ करारीपणा.

णीव स्फूर्ति निर्मळा । जयेचेनि स्वानंदसोहळा । ज्ञानशक्ती ॥ ८ ॥ जे लावण्यस्वरूपाची शोभा । जे परब्रह्मसूर्याची प्रभा । जे शब्दीं वदोनि उभा । संसार नासी ॥ ९ ॥ जे मोक्षश्रिया माहामंगळा । जे सत्रावी[1] जीवनकळा । जे सत्वलीळा सुसीतळा । लावण्यखाणी ॥ १० ॥ जे अव्येक्त पुरुषाची वेक्ती । विस्तारें वाढली इच्छाशक्ती । जे कळीकाळाची नियंती । सद्गुरुकृपा ॥ ११ ॥ जे परमार्थमार्गीचा विचार । निवडून दावी सारासार । भवसिंधूचा पैलपार । पाववी शब्दबळें ॥ १२ ॥ ऐसी बहुवेषें नटली । माया शारदा येकली । सिद्धचि अंतरीं संचली । चतुर्विधा प्रकारें[2] ॥ १३ ॥ तीहीं वाचा अंतरीं आलें । तें वैखरिया प्रगट केलें । ह्मणौन कर्तुत्व जितुकें जालें । तें शारदागुणें ॥ १४ ॥ जे ब्रह्मादिकांची जननी । हरीहर जयेपासुनी । सृष्टिरचना लोक तिनी । विस्तार जयेचा ॥ १५ ॥ जे परमार्थाचें मूळ । नांतरी सद्विद्याचि केवळ । निवांत निर्मळ निश्चळ । स्वरूपस्थिती ॥ १६ ॥ जे योगियांचे ध्यानीं । जे साधकाचे चिंतनीं । जे सिद्धांचे अंतःकर्णी । समाधिरूपें ॥ १७ ॥ जे निर्गुणाची वोळखण । जे अनुभवाची खूण । जे व्यापकपणें संपूर्ण । सर्वां घटीं ॥ १८ ॥ शास्त्रें पुराणें वेद श्रुती । अखंड जयेचें स्वतन करिती । नाना रूपीं जयेसि स्तविती । प्राणीमात्र ॥ १९ ॥ जे वेदशास्त्रांची महिमा । जे निरोपमाची उपमा । जयेकरितां परमात्मा । ऐसें बोलिजे ॥ २० ॥ नाना विद्या कळा सिद्धी । नाना निश्चयाची बुद्धी । जे सूक्ष्म वस्तूची शुद्धी । ज्ञप्तीमात्रें[3] ॥ २१ ॥ जे हरीभक्तांची निजभक्ती । अंतर्निष्ठांची अंतरस्थिती । जे जीवन्मुक्तांची मुक्ती । सायोज्यता ते ॥ २२ ॥ जे अनंत माया वैष्णवी । नकळे नाटक लाघवी । जे थोरथोरासी गोवी । जाणपणें ॥ २३ ॥ जें जें दृष्टीनें देखिलें । जें जें शब्दें वोळखिलें । जें जें मनास भासलें । तितुकें रूप जयेचें ॥ २४ ॥ स्तवन भजन भक्ति

---

१ ब्रह्मरंध्रांतून जो अमृताचा स्राव होतो तो. २ परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी या चार वाणींच्या रूपानें. ३ ज्ञानस्वरूप.

भाव । मायेवांचून नाहीं ठाव । या वचनाचा अभिप्राव । अनुभवी जाणती ॥ २५ ॥ ह्मणौनि थोराहूनि थोर । जे ईश्वराचा ईश्वर । तयेसी माझा नमस्कार । तदांशेंचि आतां ॥ २६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शारदास्तवननाम समास तृतीय ॥ ३ ॥

॥ श्रीराम ॥

**आतां** सद्गुरु वर्णवेना । जेथें माया स्पर्शों सकेना । तें स्वरूप मज अज्ञाना । काय कळे ॥ १ ॥ नकळे नकळे नेति नेति । ऐसें बोलतसे श्रुति । तेथें मज मूर्खाची मती । पवाडेल कोठें ॥ २ ॥ मज न कळे हा विचारु । दुन्हूनि माझा नमस्कारु । गुरुदेवा पैलपारु । पाववी मज ॥ ३ ॥ होती स्तवनाची दुराशा । तुटला मायेचा भर्वसा । आतां असाल तैसे असा । सद्गुरु स्वामी ॥ ४ ॥ मायेच्या बळें करीन स्तवन । ऐसें वांछित होतें मन । माया जाली लज्यायमान । काय करूं ॥ ५ ॥ नातुडे मुख्य परमात्मा । ह्मणौनि करावी लागे प्रतिमा । तैसा मायायोगें महिमा । वर्णीन सद्गुरूचा ॥ ६ ॥ आपल्या भावासारिखा मनीं । देव आठवावा ध्यानीं । तैसा सद्गुरु हा स्तवनीं । स्तऊं आतां ॥ ७ ॥ जय जयाजि सद्गुरुराजा । विश्वंभरा विश्वबीजा । परम पुरुषा मोक्षध्वजा । दीनबंधु ॥ ८ ॥ तुझीयेन अभयंकरें । अनावर माया हे वोसरे । जैसें सूर्यप्रकाशें अंधारें । पळोन जाये ॥ ९ ॥ आदित्यें अंधकार निवारे । परंतु मागुतें ब्रह्मांड भरे । नीर्सी[3] जालिया नंतरें । पुन्हा काळोखें ॥ १० ॥ तैसा नव्हे स्वामीरावो । करी जन्ममृत्य वाव । समूळ अज्ञानाचा ठाव । पुसून टाकी ॥ ११ ॥ सुवर्णाचें लोहो कांहीं । सर्वथा होणार नाहीं । तैसा गुरुदास संदेहीं । पडोंचि नेणे सर्वथा ॥ १२ ॥ कां सरिता गंगेसी मिळाली । मिळणी होतां गंगा जाली । मग जरी

---

१ या समासांत शारदा ह्मणजे माया असा अर्थ करून शारदेचें स्तवन केलें आहे, हें उघड आहे. २ शिरकेल. ३ रात्र.

वेगळीं केलीं । तरी होणार नाहीं सर्वथा ॥ १३ ॥ परी ते सारितां नि-ळणीमागें । वाहाळ मानिजेत जगें । तैसा नव्हे शिष्य वेगें । स्वामीच होये ॥ १४ ॥ परीस आपणा ऐसें करीना । सुवर्णें लोहो पालटेना । उपदेश करी बहुत जना । अंकित सद्गुरूचा ॥ १५ ॥ शिष्यास गुरुत्व प्राप्त होये । सुवर्णें सुवर्ण कारितां नये । ह्मणौनि उपमा न साहे । सद्गुरूसी परिसाची ॥ १६ ॥ उपमे द्यावा सागर । तरी तो अत्यंतची क्षार । अथवा ह्मणों क्षीरसागर । तरी तो नासेल कल्पांतीं ॥ १७ ॥ उपमे द्यावा जरि मेरू । तरी तो जड पाषाण कठोरू । तैसा नव्हे कीं सद्गुरु । कोमळ दिनाचा ॥ १८ ॥ उपमे ह्मणों गगन । तरी गगनापरीस तें निर्गुण । याकारणें दृष्टांत हीन । सद्गुरूसे गगनाचा ॥ १९ ॥ धीरपणें उपमूं जगती । तरी हेहि खचेल कल्पांतीं । ह्मणौन धीरत्वास दृष्टांतीं । हीन वसुंधरा ॥ २० ॥ आतां उपमावा गभस्ती । तरी गभस्तीचा प्रकाश किती । शास्त्रें मर्यादा बोलती । सद्गुरु अमर्याद ॥ २१ ॥ ह्मणौनि उपमे उणा दिनकर । सद्गुरुज्ञानप्रकाश थोर । आतां उपमावा फणीवर । तरी तोही भारवाही ॥ २२ ॥ आतां उपमे द्यावें जळ । तरी तें काळांतरीं आटेल सकळ । सद्गुरुरूप तें निश्चळ । जाणार नाहीं ॥ २३ ॥ सद्गुरूसी उपमावें अमृत । तरी अमर धरिती मृत्यपंथ । सद्गुरुकृपा यथार्थ । अमर करी ॥ २४ ॥ सद्गुरूसी ह्मणावें कल्पतरु । तरी हा कल्पनेतीत विचारु । कल्पवृक्षाचा अंगिकारु । कोण करी ॥ २५ ॥ चिंता मात्र नाहीं मनीं । कोण पुसे चिंतामणी । कामधेनूचीं दुभणी । निःकामासी न लगती ॥ २६ ॥ सद्गुरु ह्मणों लक्ष्मीवंत । तरी ते लक्ष्मी नाशिवंत । ज्याचे द्वारीं असे तिष्ठत । मोक्षलक्ष्मी ॥ २७ ॥ स्वर्गलोक इंद्रसंपती । हे काळांतरीं विटंबती । सद्गुरुकृपेची प्राप्ती । काळांतरीं चळेना ॥ २८ ॥ हरीहर ब्रह्मादिक । नाश पावती सकळिक । सर्वदा अविनाश येक । सद्गुरुपद ॥ २९ ॥ तयासी उपमा काय द्यावी । नाशिवंत सृष्टी आघवी । पंचभूतिक उठाठेवी । नचले तेथें ॥ ३० ॥ ह्म-

णौनि सद्गुरु वर्णवेना । [1]हे गे हेचि माझी वर्णना । अंतरस्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती ॥ ३१ ॥ इति सद्गुरुस्तवन नाम समास ॥४॥

॥ श्रीराम ॥

आतां वंदीन संतसज्जन । जे परमार्थाचें [2]अधिष्ठान । जयांचेनि गुह्यज्ञान । प्रगटे जनीं ॥ १ ॥ जे [3]वस्तु परम दुल्लभ । जयेचा अलभ्य लाभ । तेंचि होये सुल्लभ । संतसंगेंकरूनी ॥ २ ॥ वस्तु प्रगटचि असे। पाहातां कोणासीच न दिसे । नाना साधनीं सायासें । न पडे ठाई ॥ ३ ॥ जेथें परीक्षवंत ठकले । नांतरी डोळसचि अंध जाले । पाहात असतांचि चुकले । निज वस्तूसी ॥ ४ ॥ जें दीपाचेनि दिसेना । नाना प्रकारें गवसेना । नेत्रांजनेंहि वसेना । दृष्टीपुढें ॥ ५ ॥ सोळाकळी पूर्ण शशी । दाखऊं सकेना वस्तूसी । तीव्र आदित्य कळाराशी । तोहि दाखवीना ॥ ६ ॥ जया सूर्याचेनि प्रकारों । [4]ऊर्णतंतु तोहि दिसे । नाना सूक्ष्म पदार्थ भासे । अणुरेणादिक ॥ ७॥ चिरलें [5]वाळाग्र तेंहि प्रकाशी। परी तो दाखवींना वस्तूसी । ते जयाचेनि साधकांसी । प्राप्त होये ॥ ८ ॥ जेथें आक्षेप आटले । जेथें प्रेत्न प्रस्तावले । जेथें तर्क मंदावले । तर्कितां निजवस्तूसी ॥ ९ ॥ वळे विवेकाची [6]वेंगडी । पडे शब्दाची बोबडी। जेथें मनाची तांतडी । कामा नये ॥ १० ॥ जो बोलकेपणें विशेष । सहस्र मुखांचा जो शेष । तोहि सिणला निःशेष । वस्तु न संगवे ॥ ११ ॥ वेदें प्रकाशिलें सर्वही । वेदविरहित कांहीं नाहीं । तो वेद कोणासही । दाखऊं सकेना ॥ १२ ॥ तेचि वस्तु संतसंगें । स्वानुभवें कळों लागे । त्यांचा महिमा वचनीं सांगे । ऐसा कवणु ॥ १३ ॥ विचित्र काळ ये मायेची । परी वोळखी न संगवे वस्तूची । मायातीता

---

१ हे गे हेचि=ही जी आहे तीच. गे हें पादपूरणार्थ आहे. "सद्गुरूचें वर्णन होत नाहीं हेंच सद्गुरूचें वर्णन" असा अर्थ. २ आश्रय. ३ ब्रह्म. ४ लोकरीचा बारीक धागा. ५ वाळाग्र. केसाचें टोंक. ६ वेंगर्डा, आंग आवळलें जाणें किंवा आकुंचित होणें त्याचें नांव वेंगडी.

अनंताची । संत सोये सांगती ॥ १४ ॥ वस्तूसी वर्णिलें नवचे । तेंचि स्वरूप संतांचें । याकारणें वचनाचें । कार्य नाहीं ॥ १५ ॥ संत आनंदाचें स्थळ । संत सुखचि केवळ । नाना संतोषाचें मूळ । ते हे संत ॥१६॥ संत विश्रांतीची विश्रांती। संत तृप्तीची निजतृप्ती । नातरी भक्तीची फळश्रुती ॥ ते हे संत ॥ १७ ॥ संत धर्माचें धर्मक्षेत्र । संत स्वरूपाचें सत्पात्र । नातरी पुण्याची पवित्र । पुण्य भूमी ॥ १८ ॥ संत समाधीचें मंदिर । संत विवेकाचें भांडार । नातरी बोलिजे माहेर । सायोज्यमुक्तीचें ॥ १९ ॥ संत सत्याचा निश्चयो । संत सार्थकाचा जयो । संत प्राप्तीचा समयो । सिद्धरूप ॥ २० ॥ मोक्षश्रिया आळंकृत । ऐसे हे संत श्रीमंत । जीव दरिद्री असंख्यात । नृपती केले ॥ २१ ॥ जे समर्थपणें उदार । जे कां अत्यंत दानशूर । तयांचेनि हा ज्ञानविचार । दिधला नवचे ॥ २२ ॥ माहाराजे चक्रवती । जाले आहेत पुढें होती । परंतु कोणी सायोज्यमुक्ती । देणार नाहीं ॥२३॥ जें त्रैलोकीं नाहीं दान। तें करिती संतसज्जन । तयां संतांचें महिमान । काय ह्मणौनि वर्णावें ॥ २४ ॥ जें त्रैलोक्याहून वेगळें । जें वेदश्रुतीसी नाकळे । तेंचि जयांचेनि बोळे । परब्रह्म अंतरीं ॥ २५ ॥ ऐसी संतांची महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा । जयांचेनि मुख्य परमात्मा । प्रगट होये ॥ २६ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे संतस्तवननाम समास पांचवा ॥ ५ ॥

॥ श्रीराम ॥

आतां वंदूं श्रोतेजन । भक्त ज्ञानी संत सजन । विरक्त योगी गुणसंपन्न । सत्यवादी ॥ १ ॥ येक सत्वाचे सागर । येक बुद्धीचे आगर । येक श्रोते वैरागर[1] । नाना शब्दरत्नांचे ॥ २ ॥ जे नाना अर्थामृताचे भोक्ते । जे प्रसंगीं वक्तयाचे वक्ते । नाना संशयातें छेदिते । निश्चै पुरुष ॥ ३ ॥ ज्यांची धारणा अपार । जे ईश्वराचे अवतार । नातरी प्र-

---

१ खाण.

